(अ) बल्लरी दादा बल्लरी ।
चांदगांव नादगांव नरे आंबेगांव ॥ १ ॥
तुझ्या येळाची चमचम । झणकारी बांगडी ।
फुलेरी चापा बल्लरी ॥ २ ॥

ताडीवर माडी जुंधळं काढी ।
घाल काय धुंवर बल्लरी ॥ ३ ॥

भानाया माळसा वाण्याची ।
सार्वि जेजुरि सोन्याची ॥ ४ ॥

नउ बाई लाखाची पायरी ।
आंत देव नांदतो मल्हारी ॥ ५ ॥

काळीं करवंदें वेंचाया ।
जाऊं बाई बल्लरी बल्लरी ॥ ६ ॥

(ब) चौघे दिर माझे नांदती । कौलारि घर बांधती ॥ ध्रु० ॥
सासु माझी ग सागर । नित घाली करकर ॥
नणंदा माझ्या ग हाणकारणी । उठून टोला देती ॥ १ ॥

धाकली जाऊ मांझी सुखवासी । कामाला हात नाई लावती ।
घरींच घरधंदा । मी करितें ।
एकली पाण्याला जातें ॥ २ ॥

जीव बाइ करंजला कामानीं ।
जातीं माहेराला ॥ ३ ॥
[ सासर नव्हं ग हा इंचू । ]
विंचूं नव्हं ही इंगळी ।
जोव माझा तरमळी ॥ ४ ॥

इंगळी नव्हं ते सरप ।
अंतरली मायबाप ॥ ५ ॥ चौघे दिर० ॥

याप्रमाणें प्रश्ननिर्मितीच्या पहिल्या दोन अवस्थांची थोडक्यांत तोंडओळख करून घेतल्यानंतर या वाङ्मयांतील गद्यविभागाकडे वळणें युक्त होईल. 'गद्य' व 'पद्य' असें या वाङ्मयाचें वर्गीकरण केल्यास गद्य वाङ्मयांत कहाण्या, म्हणी व उखाणे यांचा समावेश होतो हें आपण पूर्वी पाहिलेंच आहे. या गद्यवाङ्मयांत दिसून येणाऱ्या सामान्य गोष्टी म्हणजे 'लयबद्ध आवर्तनांची विपुलता' व 'यमकाची घेतलेली भरपूर मदत' ह्या होत. लेखनकलेची मदत नसल्यामुळें स्मरणशक्तीवरच हें वाङ्मय टिकविण्याचा भार पडला. तेव्हां स्मरण-शक्तीला मदतनीस म्हणून 'लयबद्ध आवर्तन' व 'यमक' यावें हें स्वाभाविकच आहे. यांतील कहाण्या व म्हणी यांचा थोडा परामर्ष घेऊन मग याचा मूलाधार जो उखाणे त्याच्या विस्तृत वर्णनाकडे वळणें योग्य होईल.

# गद्यवाङ्‌मयसमूह : : ५

लोकांचे तोंडांत खेळणारें व त्याच रीतीनें पिढ्यान् पिढ्या चालत आलेलें कथा-वाङ्मय याला आपण सामान्यतः 'लोककथा' असें म्हणण्यास हरकत नाहीं. यामध्यें लोकांच्या गप्पांच्या बैठकींत सांगितल्या जाणाऱ्या गोष्टी, लहान मुलांना आजीबाईंनीं सांगितलेल्या गोष्टी, स्त्रीसमाजांत सांगितल्या जाणाऱ्या गोष्टी, इ. अनेक विभाग कल्पितां येतील. अशा कथा किती काळपर्यंत टिकूं शकतात व अविकृतपणें सांगितल्या जातात, याचें उदाहरण म्हणजे लहान मुलांची आवडती 'कावळा-चिमणीची गोष्ट.'

लीळाचरित्रांत, महानुभाव पंथप्रवर्तक 'श्रीचक्रधर' 'सारंग' पंडिताची मुलगी 'धानाई' हिला 'कावळा-चिमणीची गोष्ट' सांगतात असा उल्लेख येतो.

"सवर्से भणितलें : बाइ : तथा धाइया : हे तुम्हां कहाणी सांघैल : आली : पासी पैसली : साळैचें घर मेणाचें : काउळेयाचें घर सेंणाचें : पाउसाळा काउळयाचें घर पुरें जाए : साळैचें घर वाचे : मग उगीचि राहिली :"

—(लीळाचरित्र, भाग दुसरा, पूर्वार्धे, खंड १ ला, पान १४)

या बालकथेनें ज्ञानेश्वरीपुढेंहि वयोवृद्धत्वाचा हक्क सांगावा आणि हा हक्क निर्माण होण्यास "कावळ्याचं घर होतं शेणाचं आणि चिमणीचं घर होतं मेणाचं" या वाक्यरचनेंतील लयबद्धतेमुळें निर्माण झालेलें आंदोलन व 'शेणाचं-मेणाचं' हें यमक यांचा फार उपयोग झाला आहे यांत शंका नाहीं. आजहि ही गोष्ट सांगितली जाते तेव्हां त्यांतील पुढील आंदोलनें मुलांना हृद्य वाटतात :—

(१) चिमबाई ! चिमबाई ! दार उघड.

(२) हाय ! हाय ! चिमूबाईची खिचडी खाल्ली ।
माझी शेपूट भाजली । हाय ! हाय !

**कहाण्या** :—कहाणी-वाङ्मय हें स्त्रियांच्या तोंडीं खेळणाऱ्या लोककथांत सामावतें. व्रतवैकल्य-प्रसंगींच आवर्जून सांगावयाच्या ध्येयनिष्ठ गोष्टी म्हणून यांचेभोंवतीं जें एक पावित्र्याचें वलय निर्माण झालें आहे त्याचा सातत्य व अविकृतता राखण्यास जास्तच उपयोग झालेला आहे.

स्त्री—वाङ्मयांत कहाण्या हा बराच मोठा विभाग आहे व्रतवैकल्याचे वेळीं कोणतेंहि व्रत कां करावयाचें याचा पौराणिक दाखला घेण्यासाठीं या कथा रचलेल्या असतात. "हा वसा पुरुषांनींहि वसावा" असें कहाण्यांत सांगितलेलें असतें. पण असे वसे पुरुषांनीं वसलेले फारसे ऐकिवांत तरी नाहींत. लहान लहान, सोपीं सोपीं वाक्यें, आंदोलन निर्माण करणारे लयबद्ध अक्षरसमूह, ठरीव वाक्यांची पुनरावृत्ति व मनाची पकड घेणारें एखादें शेवटचें वाक्य, अशी लोककथांत आढळून येणारी सामुग्री यांतहि आढळते. लेखनकलेच्या अभावीं सर्वच स्मरणांत ठेवावयाचें व त्यासाठीं पद्यांत आढळणाऱ्या या वैशिष्ट्यांची मदत साहजिकच कहाण्यांसारख्या लोककथांना घ्यावीशी वाटली. उदाहरणार्थ, सोमवारच्या कहाणींत: "शिवा, शिवा, महादेवा, ज्योतलिंग, कोटलिंगा, सासु-सासऱ्यां, दिराजावां, नावडती आहे ती आवडती कर रे ऽऽऽ देवा !"

मंगळागौरीच्या कहाणींत मुली कळ्या तोडीत होत्या. एकीनं दुसरीला खांडगाळी शिवी दिली. दुसरी म्हणाली, "मला अशी

शिवी देऊं नको. आमच्या कुळांत असं कुणी होत नाहीं." मुलीचें हें बोलणें ऐकून मामा तिला म्हणाला, "अग अग मुली, तुझं घर कुठं?" मुलगी म्हणाली, "ब्राह्मण पोथी वाचतात, आकाशीं धोतरं वाळतात, गंगाळीं पाणी तापतं तें माझं घर."

त्यानंतर उत्तरार्धात मामा आपल्या भाचास व सुनेस घेऊन गांवीं परत जातो. त्या वेळचें वर्णन: लोक सांगूं लागले, "उठा उठा भटजी, तुमचा लेक आला. तुमची सून आली." भटजी उठेनात. भटजी पाहीनात. म्हणूं लागले, "आम्हांला कुठला मुलगा! आम्हांला कुठली सून!" सर्वांची भेट झाली. "सासू उठली, सुनेचे पाय धरले." सून म्हणाली, "उठा, उठा सासुबाई, वळचणीचं पाणी कधीं आढ्याला गेलं आहे का? गंगा कधीं उलटी वाहते का?" सासू म्हणाली, 'असं म्हणूं नको. तुझ्यामुळं माझं बाळ वांचलं."

**म्हणी:**—या शरीरानें उखाण्यासारख्या दिसतात. खेळांत पार्श्व-संगीताचें काम करावें न लागल्यानें त्यांचें गद्यस्वरूप राहिलें. पण स्मरणीय होण्यासाठीं यमक त्यांत आलें. गद्यमय रचना व अंतीं यमक पाहून यांचा व उखाण्यांचा तोंडवळा सारखा वाटला तरी स्वभावांत महदंतर आहे. निरर्थक शब्द म्हणींत खपावयाचे नाहींत. उलट थोड्या जागेंत जितका अर्थ सामावेल तितका सामावून घेणें व मुरलेल्या लोणच्याप्रमाणें मुरलेलें अनुभवाचें शहाणपण लोकांना सांगणें हें 'म्हणीचें' काम. येथें 'शहाणपण' अभिप्रेत असतें, मनोरंजन नव्हे. म्हणींचा विचार इतरत्र झालेला आहे. त्यांत अमुक म्हणी बायकांनीं म्हणाव्या अगर अमुक पुरुषांनीं म्हणाव्या असें बंधन नाहीं व असण्याचें कारण नाहीं; पण त्यांतल्या त्यांत कोणच्या म्हणी स्त्रियांच्या बोलण्यांत जास्त येत असतील हें थोडें सुचवितां येईल.

उदाहरणार्थ—(१) सवत साहिना व मूल होईना.

(२) जिकडे गेली वांझ तिकडे आली सांज.

## उखाणा : : ६

पद्यनिर्मितीची ही दुसरी अवस्था खेळांतील उखाण्यांतहि सापडते. खेळतांना पार्श्वसंगीतासारखा उपयोग; रचनेनें गद्य पण यमकाचें महत्त्व अनिवार्य. त्यामुळें म्हणीप्रमाणेंच गद्य-पद्यांतील असले तरी पद्याला जास्त जवळचे वाटतात.

(१) " आपुटपु आले, घाटवरन गेले।
काचेचे पेले माझे फुटून गेले ॥ "

(२) " फुगडी खेळू दण्णादण्णा, रुपये मोजू खण्णाखण्णा।
बाभळीची साल, माझा कंबरपट्टा लाल ॥ "

हे उखाणे अर्थापेक्षां यमक व पावलांच्या टपटप आवाजांशीं साथ करणारे ' दण्णादण्णा ', 'खण्णाखण्णा' शब्द यामुळें पार्श्वसंगीतेंच होत.

परंतु उखाण्याचा उपयोग अर्थ सांगण्यासाठींही फार चांगला होतो. खेळाच्या साथींतून याचा जन्म झाल्यामुळें अर्थपूर्णतेचें बंधन यावर नाहीं. निम्म्या ओळींत अर्थ नसला व पहिल्या ओळीचा दुसरीच्या अर्थाशीं संबंध नसला तरी हरकत नसते. पण असें असूनहि रागलोभ आदि मनाच्या भावना ठसकेदारपणें यांतून व्यक्त करतां येतात. याखेरीज दुसऱ्यावर टीका करणें, टोंचून बोलणें, उणेंपुरें काढणें,

उखाळ्यापाखाळ्या काढणें, या गोष्टी उखाण्याच्या मदतीनें फार सुलभतेनें व परिणामकारकपणें होतात. लहान जीव व भलताच तिखटपणा यामुळें 'लवंगी मिरची' म्हणून या विभागाचें वर्णन करण्यास हरकत नाहीं.

(१) "चहा बाई चहा, रानोमाळी चहा ।
मैत्रिणी मैत्रिणींची फुगडी पहा ॥" दुसऱ्या ओळींतच अर्थ.

(२) "आमच्यां चुलीवर उपकरणी ।
ठकूचा नवरा कुळकर्णी ॥" ठकूच्या नवऱ्यावर टीका.

(३) "पाठीवर शेपटा लडबडतो ।
म्हातारा नवरा बडबडतो" ॥ पाठीवर लोळणाऱ्या शेपट्यावर टीका. आज पाठीवर शेपटा हीच रूढ केशरचना झाल्यानें हा उखाणा निरुपयोगी होईल हें वेगळें.

(४) "साळ्यांच्या मुली तुम्ही अशा ग कशा ।
हातांत बुकं, मास्तरणी जशा ॥" मुलींच्या शाळेंत जाऊन शिकण्यावर टीका. 'मास्तरीण' ही जवळजवळ शिवीच होती. अविवाहित मुलीची कोणी 'नांव घे' म्हणून चेष्टा केल्यास :

"समोरच्या कोनाडयांत ठेवलं तिखट ।
आईबापांनीं लग्न केलं नाहीं ।
तर नांव कुणाचं घेऊं फुकट ॥"

हा उखाणा घेऊन ती ठसकेदारपणें उत्तर देऊं शकते. नवविवाहित वधू वरातीनंतर गृहप्रवेशाचे वेळीं पुढील उखाणा घेईल :—

"चंदनाच्या मांडवावर जाईची वेली ।
इतके दिवस आईबापांनीं जतन केली ।
पण 'यशवंतरावांनीं' एका घटकेंत नेली ॥"

आणि विवाहामुळें होणाऱ्या माहेरच्या व आईबापांच्या तातातुटीचें सहृदयेतेनें वर्णन करील.

युवती आपल्या प्रिय पतीच्या अद्वितीयत्वाचें वर्णन पुढीलप्रमाणें करील :—

“ बहु शोधिली वसुंधरा । अशा पुरुषाची वाण ।
सासुबाईच्या पोटीं, ‘ नारायणराव ’ नवरत्नांची खाण ॥ ”

किंवा अत्तर अत्तर झाड, त्याचं कत्तर कत्तर पान ।
शोधलं हिंदुस्थान, त्यांत ‘ नारायणराव ’ मिळाले छान ॥ ”

पण अनुरागवती प्रौढा शाब्दिक वर्णन करण्याच्या भानगडींत न पडतां नुसतेंच म्हणेल :—

“ काळी गळसरी गळाभर ।
नारायणरावांना पाहीन डोळाभर ॥ ”

उपरोध, मानापमानाचे झटके, टोंचून बोलणें, ह्यांचा आविष्कार विहिणी व करवल्या यांनीं परस्पर घातलेल्या उखाण्यांत होतो व त्यामुळें पूर्वीच्या लग्नकार्यांत हे उखाणे पुष्कळदां मोठे कलह लावणारे होत व घरांत एखादें कार्य ठरवल्याबरोबर उत्साही करवल्यांना “ उखाणे घालूं नका ” अशी समज देणें वडील माणसांना पूर्वीं भाग पडे. कारण विहिणी–विहिणींची पंगत बसली असतां त्यांचा दिलखुश करण्यासाठीं एखादी पोक्त बाई उखाणा म्हणे :—

“ समोरच्या कोनाड्यांत ठेवला तवा
‘ गोडबोल्यांच्या ’ विहिणींनो, सावकाश जेवा ॥ ”

तोंच एखादी बोलघेवडी करवली पुढें येऊन मुलाकडच्या जेवणावळींत कांहीं कमी पडलं असेल तेवढंच उखाणा घालून सांगे कीं,

“ वांगीभात खाल्ला तुपाशीं, ‘ गोडबोल्यांच्या ’ घरीं
‘ लेल्यांचे ’ गडी राहिले उपाशीं ॥ ”

व मग मोठ्या माणसांना क्षमा मागतांना पुरेवाट होई. ही उखाण्यांत बोलावयाची संवय स्त्रियांना फार मानवते असें दिसतें. कारण साध्या गोष्टी बोलतां बोलतांहि तोंडांतून त्यांना भर भर उखाण्याचें स्वरूप येतें.

नवी सासुरवाशीण सासरीं आली तेव्हां आईनें उपदेश केला होता

कीं, सासरीं सर्वांना 'अहो-जाहो' म्हणावें. मुलगी जरा जास्तच आज्ञाधारक होती. सकाळीं सडा घालतांना अंगणांत कुत्रें आलें तेव्हां बिचारी म्हणूं लागली—

"अहो अहो हडा, येऊं नका पुढां,
मी घालतें सडा, उडेल शिंतोडा,
आणि सासुबाई बोलतील फडाफडा ॥"

मुलगी मोठी होऊं लागली म्हणजे तिला स्थळ कसें शोधावयाचें याचें मनोराज्य आई करीत असते. आपली मुलगी चांगली याबद्दल तिला शंकाच नसते. डोक्यावर दुधाच्या घागरी घेऊन मनोराज्य करीत चालणाऱ्या गवळणीप्रमाणें मुलीला मागणी आली अशी कल्पना करून झटक्यांत नकारहि देऊन मोकळी झाल्याचें वर्णन पुढील उखाण्यांत येतें:—

"मुंबईसारखं शहर, पुण्यासारखं घर,
नवरा प्रथम वर, सासरा बालिष्टर,
डागिने परातभर, येवढी बोली करा,
नाहींतर आपला रस्ता धरा."

नवरा बालिष्टर असून प्रथमवरहि असेल तर कदाचित् परातभर दागिने मिळणें जड पडेल म्हणून "प्रथमवर नवरा" व "बालिष्टर सासरा" अशी व्यावहारिक तडजोड सुचली असावी.

दुसरा असाच उखाणा मी सातारप्रांतीं ऐकला. आई सांगते, मुलीला घर कसं पाह्यचं, तर—

"भात भाजी दह्याची कढी
बाई, ब्राह्मण, शिवाय गडी
नळाचं पाणी, पऱ्याचं घर
जावयाला देणगी ?
नारळाचं फळ ऽ"

गांवोगांवीं नळ नव्हते, रहाटानें पाणी काढतां काढतां सासुरवाशिणीची कंबर मोडे, तो जुना काळ. शिवाय सातारला पाऊस फार;

तेव्हा पत्र्याचं घर असल्यास कौलारू घराप्रमाणें गळण्याची भीति नाहीं. या दृष्टीनें त्या काळची ही इच्छा योग्य होती. पण धान्य-नियंत्रण, दुधदुभत्याचा दुष्काळ व नोकर माणसांची टंचाई असणाऱ्या हल्लींच्या दिवसांतहि " भात, भाजी, दह्याची कढी " जेवायला घालून वर " बाई, ब्राह्मण, शिवाय गडी " पुरविणारें स्थळ केव्हांहि विलोभनीयच वाटेल. आईची अपेक्षा ऐकून शेजारणीनें साहजिकच विचारलें, " स्थळ चांगलें खरें ! पण ' जावयाला देणगी ? ' " आई म्हणते, " नारळाचें फळ ! " मुलगी व नारळ हवाली करीन. माझ्या मुलीसारखी चांगली मुलगी असल्यावर हुंडाचिंडा काय करायचा हा भावार्थ. महत्त्वाकांक्षी पण चिक्कू मुलीच्या आईचें हें छान वर्णन आहे.

तसाच दुसरा उखाणा. मुलगी पहिल्या खेपेला सासरीं जाऊन माहेरीं आली म्हणजे माहेरचीं सर्वच माणसें तिच्या सासरच्या अनुभवाबद्दल जिज्ञासु असतात व प्रत्येक जण तिला सासू कशी आहे, सासरा कसा आहे, नवरा कसा, इ. प्रश्न विचारीत असतात व तीहि प्रत्येकाद्दलचा आपला झालेला ग्रह सांगत असते. मौजेची गोष्ट येवढीच कीं, तिच्या मतें सर्व घरांत एकटा नवरा व ती स्वतः चांगलीं ठरतात.

सासु कशी सासु कशी ? ।
टिचकिन् मारायची पिसु जशी ॥
सासरा कसा सासरा कसा ? ।
रहाटाचा कासरा जसा ॥
दीर कसा दीर कसा ? ।
खराट्याचा हीर जसा ॥
नणंद कशी नणंद कशी ? ।
भाताची कणंग जशी ॥
ते कसे ते कसे ? ।
देव्हाऱ्यांतले देव जसे ॥
मी कशी मी कशी ? ।
घरांतलीं लक्ष्मी जशी ॥

याच्याबरोबर गुजराती भाषेंतील ‘ पांदडे ’ ह्या स्त्रीगीताची तुलना करून पाहणें मनोरंजक आहे.

कुणबी–माळी, तसेंच शेतकरी–कामकरी, यांच्या स्त्रियांमध्यें “ नांव घेण्याचे ” जे उखाणे आहेत, त्यांचें एक वेगळेंच वैशिष्टय आहे. पांढरपेशावर्गांतील स्त्रियांत रूढ असणारे उखाणे, शक्य तों लहान व चटकदार असतात. परंतु या स्त्रियांचे उखाणे शक्य तितके लांबलचक असतात. शेवटच्या दोन ओळींत नवऱ्याचें नांव व त्याला पोषक अशी एखादी ओळ असली तरी पहिल्या आठदहा ओळी म्हणजे एक लहानसें फेराचें गाणें म्हणावयास हरकत नाहीं. त्यांत शहरांचीं वर्णनें, पोशाकांचीं वर्णनें, सणांच्या यात्रा, कांहींहि येऊं शकतें. सामाजिक पाहणीच्या दृष्टीनें हे उखाणे जास्त महत्त्वाचे ठरतील. उदाहरणार्थ :—

“ झुणझुण झुण्यांत बसले मेण्यांत ।
खण-चोळि अंगांत, शेंदुर भांगांत ।
जायफळ वाटींत, लवंगा मुठींत ।
सोन्याची किल्ली, चांदिचं कुलूप ।
हातीं दिली किल्ली, उघडली खोली ।
खोलींत होतं हांडं सात ।
हांड्यावर परात, परातींत भात ।
भातासारखं तूप, तुपासारखं रूप ।
रुपासारखा चिरबंदी वाडा ।
चंद्रभागेला पडला वेढा ।
‘ शंकरराव ’ काम सोडा, पण मला माहेरला धाडा ।।

किंवा

झुनझुंबराचे, फुल उंबराचे ।
कळी चाफ्याची, लेक बापाची ।
सून सासऱ्याची, राणी भ्रताराची ।
भ्रतार भ्रतार म्हटलें नाहीं ।
नांव अजून घेतलें नाहीं ।

नांवासाठीं जुन्नरला गेले ।
शेले–पटके उडवित आले ।
गेले समोरच्या खोलीं ।
समोरच्या खोलींत होतें चोळी–पातळ ।
चोळी पातळाच्या पोटीं फणी ।
अशी 'पार्वती' शहाणी तर करते
'शंकररावांच्या' रागाचं पाणी ॥

किंवा

चांदिचें घंगाळ अंघोळीला, जरिकांठीं धोतर नेसायला ।
चंदनाचा पाट बसायला ।
सहाण येवल्याची, खोड बडोद्याचें ।
विलायती आरसा पाह्याला, केशर गंध लेवाया ।
चादीचें गडवे, सोन्याचे पेले ।
आंत भागीरथीचें पाणी ।
उदबत्तीचीं झाडें, रांगोळी पुढें ।
समई मोराची, तबक बिलवरचं ।
पानपूड वजनीचं, आडकित्ता कोल्हापूरचा ।
डबे सोलापूरचे, कातगोळ्या आलेगांवच्या ।
सुपारी धारवाडची, चुना गोकुमचा ।
पानें रामटेकचीं ।
छपरी पलंग सोन्याचा, जाई सेवंती सुगंधी वासाची ।
हांड्या झुंबराचा लकलकाट, बसायला पिढेपाट ।
समया तिनशें साठ ।
'शंकररावांचे' नांवावर हळदीकुंकवाचा थाट ॥

या उखाण्यांत ठराविक अक्षरगण, मात्रागण, अक्षरावलि वा मात्रावलीचें बंधन दिसत नाहीं, ठराविक ओळींचें बंधन दिसत नाहीं, यमक

असलें तरी बंधनात्मक नाहीं. मुक्तछंदाच्या वादविवादांत मी आतां जाऊं इच्छीत नाहीं. पण हे उखाणे वाचून यांना 'मुक्तछंद' म्हणण्याचा मोह मला होत आहे. आतांपर्यंत वर्णन केलेल्या वाङ्मयप्रकारांत आपण पद्यनिर्मितीच्या दोन अवस्था म्हणजे 'लयबद्ध निरर्थक शब्दरचना' 'व अर्थयुक्त पण लयबद्ध शब्दरचना' या पाहिल्या. यापुढील पद्यप्रकारांत आपणांस पद्याचें परिणत स्वरूप म्हणजे 'अर्थप्रधान लयबद्ध शब्दरचना' पहावयास सांपडेल.

या सर्व प्रकारांखेरीज कोडें सांगणारे उखाणे म्हणून एक विभाग आहेच. पण तो निव्वळ बायकांचाच असा नसल्यामुळें प्रथम त्याचें वर्णन केलें नाहीं. तरी उदाहरणादाखल एकदोन नमुने सांगून नंतर सर्वच उखाणा-वाङ्मयाचें वर्गीकरण देणें बरें होईल.

( अ ) वर्णनावरून उत्तर सांगणें—

कूटप्रश्न :— मी जातें रागं रागं । तूं का ग माझ्यामागं ? ।

उत्तर :— सावली.

,, वाटीभर दहीं । तुझ्यानें खाववेना ।
माझ्यानें खाववेना । उत्तर :— चुना.

( आ ) पुढील उखाण्यांत वर्णन असूनही पुन्हा वर्णनांतील कांहीं अर्थाधिष्ठित अगर शब्दाधिष्ठित युक्ति वा चमत्कृति लक्षांत घेतल्याखेरीज उत्तर सांगतां येत नाहीं :—

( १ ) सासरे, जांवई शेता जाती ।
मायलेकी जेवण नेती ।
ही म्हणते तूं खा बाबा ।
नि ती म्हणते तूं खा बाबा ।

ह्या चौघांचं नातं काय ?

उत्तर :—आई, बाप, मुलगी व आईचा बाप.

( २ ) सासवा, सुना दोघी जणी ।
मायलेकी दोघी जणी ।
नणंदा भावजया दोघी जणी ।
भाकरी केल्या तीन ।
घेतल्या सगळाल्या ।
नि बसल्या वेगळाल्या ॥

सहा जणी बायका, तीन भाकरींपैकीं प्रत्येकीं एक एक सगळी घेऊन स्वतंत्र तऱ्हेनें वेगळी जेवावयाला कशी बसेल हा प्रश्न ?

उत्तर :—सासू, सून व नणंद या घरांतील बायका वस्तुतः तीनच, पण त्यांचा परस्पर नात्याचा सबंध घेऊन मोजणी केल्यास सहा बायकांचा भास उत्पन्न होतो.

( ३ ) एकवीस ब्राह्मण आले ।
बावीस गेले स्नानाला ।
आणि तेवीस बसले जेवायला ॥

पाहुणे आलेले वीस ब्राह्मण जेवायला बसेपर्यंत तेवीस कसे झाले?

उत्तर :—सभंग शब्दश्लेषाच्या मदतीनें.

एकवीस व एक वीस ( म्हणजे सुमारें वीसएक ).

बावीस व बावीस म्हणजे विहिरींवर.

तेवीस व ते ( पहिले आलेले ) वीस.

वीसएक ब्राह्मण पाहुणे आले व विहिरींवर जाऊन स्नान करून येऊन जेवावयास बसले हा इत्यर्थ.

( ४ ) दुकानांत डोकं.

अलंकाराप्रमाणें सभंग शब्दश्लेषाचे मदतीनें या प्रश्नांतच उत्तर सांपडतें.

उत्तर :—दु ( दोन ) कानांत डोकें.

माणसाचं डोकें दुकानांत ( बाजारांत ) असतें असें नव्हे तर दोन कानांचेमध्यें असतें.

उखाण्याचें वर्गीकरण केलें तर असें होईल :—

- उखाणा
  - कूटप्रश्न (कोड्याचे)
  - आहाणा (म्हणीसारखे)
  - पार्श्वसंगीत (खेळांतील)
  - लग्नसमारंभांतील
    - कुमारिकेनें घ्यावयाचे उखाणे
    - वधूवरांनीं घेण्याचे
      - नागरी
      - जानपद
    - विहिणी, करवल्या यांचे (परस्परांस उद्देशून बोलण्याचे)

वस्तुतः नागरी व जानपद हा भेद इतरही उखाण्यांत दाखविणें शक्य आहे, पण वधूच्या उखाण्यांत तो फार ठळकपणें डोळ्यांत भरतो.

वरील वर्गीकरणावरून असें दिसून येतें कीं, उखाणा हा स्त्री-जीवनांत अनेक ठिकाणीं येत असतो अगर असे. स्वयंपाकांत जसें मीठ तसा स्त्रियांना व्यवहारांत संभाषणाची चव वाढविण्यासाठीं उखाणा.

## जातिविचार — अनुष्टुभ छंद

पुढें प्रश्न असा येतो कीं, स्त्रीजीवनांत इतक्या मोकळेपणानें संचार करणाऱ्या या वाङ्मयप्रकाराचें स्थान कोठें? याची जात काय? सामान्य गद्यापेक्षां प्रत्येक पद्यप्रकारांत याची मोजदाद झालेली नाहीं, पण सामान्य गद्यामध्यें प्रत्येक ठिकाणीं उठून दिसावा असें याचें वेगळें व्यक्तिमत्त्व आहे हें खरें. तेव्हां नांवच द्यावयाचें झाल्यास याला अपौरुषेय वाङ्मयांतील अनुष्टुभ छंद असें म्हणणें योग्य होईल. अनुष्टुभ छंद हा अभिजात संस्कृत वाङ्मयांतील पहिला छंद वाल्मीकि ऋषींना

सहजस्फूर्त झालेला व पुढील वृत्तरचनेचा पाया. त्याप्रमाणेंच उखाणा हा बोलतां बोलतां सहजस्फूर्त झालेला असतो. चालीवर म्हणतां आला पाहिजे असें नसतें व रचना अत्यंत शिथिल.

वृत्तदर्पणकारांनीं 'अनुष्टुभ छंदाचें' वर्णन केलें आहे कीं, 'अनुष्टुभ छंद तो ज्याला, एक नेम नसे गणीं'. छंदोरचनेंत माधवराव पटवर्धनांनीं अनुष्टुभ छंदाचा विचार केला; वृत्त, जाति व छंद या त्यांनीं केलेल्या वर्गीकरणांत तो कोठेंच बसेना. त्याबद्दल ते म्हणतात (छंदोरचना, पृष्ठ १०५), याला छंद म्हणावें तर लगत्व भेद आहे, वृत्त म्हणावें तर लगक्रम निश्चित नाहीं, आणि जाति म्हणावें तर कांहीं भाग अचल व उर्वरित भाग निश्चित नाहीं नि मात्रांची संख्या नियमित नाहीं. तीच स्थिति उखाण्याची आहे. कांहीं भाग अचल व उर्वरित भाग निश्चित नाहीं नि मात्रांची संख्या नियमित नाहीं हें वर्णन उखाण्यास लागू पडतें. उखाण्याच्या जर चार ओळी मानल्या तर अचल भाग म्हणजे दुसऱ्या व चौथ्या ओळीचा शेवट हा ठरतो. पहिल्या व तिसऱ्यांत–विशेषतः तिसऱ्यांत–सर्व शिथिलता सामावलेली असते. थोडक्यांत म्हणजे सुरवात गद्य तऱ्हेनें करून शेवटीं यमक व लयबद्धता साधण्याचा प्रयत्न करावयाचा. उदाहरणार्थ:—

समोरच्या कोनाड्यांत। ठेवलं तिखट।
**आईबापांनीं लग्न नाहीं केलं**
तर नाव घेऊं कुणाचं फुकट॥

या ठिकाणीं 'ठेवलं तिखट' व 'कुणाचं फुकट' हा शेवटचा भाग अचल असून बाकीचा शिथिल आहे. पुढील 'लटपट्या' वृत्ताप्रमाणें येथें वाचतांना निर्वाह करावा लागतो.

गांवाबाहेर **मोठी थोरली विहीर,** तीमध्यें गोड पाणी।
तिच्या कांठीं **उघडा बोडका ब्राह्मण,** बैसला एक कोणी॥

त्यानें काढल्या **नासक्या कुसक्या** दशम्या, खाउनी तृप्त झाला।
पाणी पीऊन **फडकंबिडकं धुऊन** पातला स्वस्थळाला॥

या वृत्ताच्या पठणांत जाड ठशाचे शब्द गडबडीनें कसे तरी म्हणून पुढील भाग अचल राखावा लागतो व या म्हणण्याच्या लट-पटीमुळें याला 'लटपटें वृत्त' हें विनोदी नांव मिळतें. वरच्या उखाण्यांतही **आईबापांनीं लग्न नाहीं केलं** येथें 'लटपट' करावी लागते.

या अपौरुषेय वाङ्मयांतील बाकीच्या पद्यप्रकारांचें परिणत स्वरूपाप्रमाणें वर्गीकरण करतां पुढीलप्रमाणें क्रम लागतो :—

१ बैठकींतील गाणीं.
२ फेराचीं गाणीं.
३ खेळांतील गाणींवजा पार्श्वसंगीतें.
४ उखाणा.

(१) बैठकींतील गाणीं ही छंदोरचनेच्या नियमाप्रमाणें या ना त्या जातींत बसतात. पण रचना फार शिथिल असते येवढेंच. परिपूर्ण पद्यरचनेचा प्रकार असें त्याला म्हणण्यास हरकत नाहीं. किंबहुना या सर्वच वर्गीकरणांतून तीं गाळलीं तरी चालतील.

(२) व (३) फेराचीं गाणीं व खेळांतील गाणींवजा पार्श्वसंगीतें यांचें वर्गीकरण केल्यास तीं ठराविक चार-पांच प्रकारांत येतात व असा छंदप्रकार खरा, पण त्यांतही फार शिथिल असें त्यांचें वर्णन करतां येतें.

(४) 'ओवी' हा परिपूर्णतेला पोंचलेला पद्यप्रकार असला तरी फार शिथिल आहे. खुद्द ज्ञानेश्वरांनींच आपली ओवी हवी तर गावी व हवी तर वाचावी असें सांगून गद्यपद्याच्या उंबरठ्यावर उभी केली आहे. अठराव्या अध्यायांत उपसंहार करते वेळीं ज्ञानेश्वर म्हणतात—

याकारणें मियां । श्रीगीतार्थ मऱ्हाठिया ।
केला लोकां यया । दिठीचा विषो ।। १७३५ ।।
परी मऱ्हाठे बोलरंगें । कवळितां पैं गीतांगें ।
तैं गातयाचेनि पांगें । येकाढ्यता नोहे ।। ३६ ।।
म्हणौनि गीता गावों म्हणे । तैं गाणिवे होती लेणें ।
ना मोकळे तरी उणें ।. गीताही आणित ।। ३७ ।।
सुंदर आंगीं लेणें न सूये । तैं तो मोकळा शृंगारु होये ।
ना लेइलें तरी आहे । तैसे कें उचित ? ।। ३८ ।।

कां मोतियांची जैसी जाती । सोनियाही मान देती ।
नातरी मानवती । अंगेंचि सर्डी ॥ ३९ ॥
नाना गुंफिली कां मोकळीं । उणीं न होतीं परिमळीं ।
वसंतागमींचीं वाटोळीं । मोगरी जैसीं ॥ ४० ॥
तैसा गाणिवेनें भिरवी । गीतेवीणही रंगु दावी ।
तो लाभाचा प्रबंधु ओवीं । केला मियां ॥ १७४१ ॥

माझी ओवी गातां आली तर गावी, नाहीं तर वाचून दाखविली तरीही लोभकारक वाटेल असें ज्ञानेश्वर कौतुकानें सांगतात. स्त्रियांच्या ओव्यांना हें वर्णन तर लागू पडतेंच, पण अपौरुषेय वाङ्मयाचें वैशिष्ट्य म्हणून पहिला निम्मा, भरताडभरती, सुसंगत नसणारा भागही येथें खपतो.

पंढरपुरीच्या, माळिणी ठेंगण्या, ।
फुलांच्या कंगण्या, रुक्मिणीला ॥
पंढरपुरच्या, माळिणी उंच काळ्या, ।
फुलांच्या चिंचपेट्या, रुक्मिणीला ॥

वाटली तर गावी वाटली तर वाचावी, असें म्हटलें तरी वरील ओव्यांतील कार्यकारणभावविरहित ओव्या ज्ञानेश्वरांना खपणार नाहींत.

आणि या अपौरुषेय ओवीचें उखाणा हें पूर्व स्वरूप असल्यासारखें भासतें. वाटला तर गावा असें नव्हे पण गद्यतऱ्हेनें म्हटला जावा असेंच त्याचें स्वरूप; तरी पण म्हणतांना लयबद्धता जाणवावी व यमकानें चमत्कृति निर्माण व्हावी अशी याची योजना. थोडक्यांत ‘उखाणा’ हा अपौरुषेय वाङ्मयांतील म्हणूनच पुढच्या परिणत स्वरूप मराठी वाङ्मयांतील ओवी, अभंग, इ. छंदरचनेचा पूर्वज होय. म्हणूनच त्याला ‘अनुष्टुभ छंद’ हें नांव देणें सार्थ वाटतें.

**उखाण्याची परंपरागत चाल**—या वेळीं उखाण्याच्या परंपरागत चालीकडे लक्ष वेधणें स्वाभाविक आहे. स्त्रीनें व पुरुषानें नेहमींच्या व्यवहारांत एकमेकांचें नांव उच्चारावयाचें नाहीं, परंतु प्रसंगविशेषीं तें घ्यावयाचें व घेतांना उखाणा या शब्दानें सूचित होणारी कांहीं गमतीदार शब्दरचना करून त्यांत समाविष्ट करून तें उच्चारावयाचें, अशी

रूढि दिसते. पुरुषांतील हा उखाण्यासह नांव घेण्याचा प्रचार पुष्कळ कमी झाला आहे. सुशिक्षित, विशेषतः विश्वविद्यालयीन शिक्षण घेणाऱ्या, स्त्रियांतहि ही चाल मागें पडली आहे; तरीदेखील महाराष्ट्रीय समाजांत अजून फार मोठ्या प्रमाणांत या चालीचें अस्तित्व आहेच.

स्त्रीनें पतीचें नांव उच्चारावयाचें नाहीं. उच्चारल्यास त्याचें आयुष्य कमी होतें अशी एक कल्पना त्या बाबतींत रूढ आहे.* त्याचप्रमाणें पहिला मुलगा, पहिली सून यांचींहि नांवें स्त्रिया घेत नसत. त्याऐवजीं नुसतें "मुलगा", "मुली" असें संबोधून काम चाले. "आयुष्कामो न गृण्हीयान्नाम पुत्रकलत्रयोः" या स्मृतिवचनानें कांहीं त्याची संगति लावतात. गुजराती व हिंदी समाज यांच्यामध्येंही स्त्रीनें नवऱ्याचें नांव प्रत्यक्ष न उच्चारतां कांहीं सूचक नांवानें त्याजसंबंधीं (उदाहरणार्थ, बच्चुना बाप) बोलून निर्वाह करावा अशी प्रथा असल्याचें कळतें. याप्रमाणें पतिनांवाचा उच्चार न करण्याची प्रथा सार्वत्रिक दिसते, पण उखाण्यामध्यें गोवून नैमित्तिक प्रसंगीं तें घेण्याची पद्धति ही केवळ महाराष्ट्रीय दिसते. महाराष्ट्रांतील बहुतेक जातींत ही पद्धति सांपडतें.†

महाराष्ट्रामध्यें तरी ही पद्धति किती जुनी असावी या दृष्टीनें पाहतां ज्ञानेश्वर-कालापर्यंत हिचा माग लागतो. नवी नवरी नवऱ्याचें नांव न उच्चारतांच जसें तें अकर्तेपणें सुचविते, तसेंच ब्रह्माचें वर्णन कांहीं न बोलूनच करतां येतें अशा अर्थाची ओवी ज्ञानेश्वरींत‡ सांपडते. 'गुरोस्तु मौनं व्याख्यानं शिष्या विच्छिन्नसंशयाः।' या न्यायानें इतर नांवें उच्चारीत असतां विशिष्ट नांवाचे जागीं मौन धारण केलें तर मुलीच्या या मौनानें इतरांचा तिच्या नवऱ्याच्या नांवाबद्दलचा संशय विच्छिन्न व्हावा यांत संशय नाहीं. नैमित्तिक कारणासाठींच नवऱ्याचें

---

* कृ. पां. कुलकर्णी–"मराठी भाषा–उद्गम व विकास", पृष्ठ २८०.

† "विवाह व सोहळे" —श्री. अलोनी.

‡ जैसें न सांगणें वरी। बाळा पतीसी रूप करी।
बोलु निमालेपणें विवरी। अचर्चातें॥ —ज्ञाने. अ. १५।४६८
(साखरेप्रत)

नांव घेणें व तेंहि उखाण्याची योजना करून घेणें ह्याचा स्पष्ट उल्लेख एकनाथांच्या वाङ्मयांत येतो. एकनाथांनीं आपल्या वाङ्मयांत प्रसंगानुसार सामाजिक चालीरीति विस्तारानें वर्णन केल्या आहेत. रुक्मिणी-स्वयंवरात त्यांनीं विवाहप्रसंगाचे जें वर्णन १५ ते १८ अध्याय या चार अध्यायांत केलें आहे त्यावरून तत्कालीन विवाहसोहळ्याची कल्पना येते व आज प्रचलित असलेली विवाहपद्धति त्यापेक्षां फारशी बदललेली नाहीं असें दिसतें. रुक्मिणी-स्वयंवरांत पुढील वर्णन आहे :—

लग्न लागल्या येरे दिवशीं । सोहळा मांडिला वोहरासी ।
मूळ पाठविलें हळदीसी । यादवांसी भीमकें ॥ ४० ॥

न कळे भीमकीचें लाघव । सकळही म्हणती धन्य भाव ।
आतां घेउनीयां नांव । पाय मागे कृष्णाचे ॥ ५४ ॥

ऐकोनि जनाचियां गोष्टी । भीमकी दचकली पोटीं ।
काय आतां बोलूं होटीं । न दिसे दृष्टि नांवरूप ॥ ५५ ॥

* * *

पाहतां नामरूपाचा दुकाळ । घालतां साकारतेचा आळ ।
लावितां नामाचा विटाळ । तेणें गोपाळ क्षोभेल ॥ ५७ ॥

सर्वेचि म्हणे कळलें चित्ता । गोइंद्रियां नियंता ।
यासी गोयळा म्हणतां । दोष सर्वथा मज नाहीं ॥ ५८ ॥

ऐसे विचारुनि वेल्हाळा । लक्ष लाविलें चरणकमळा ।
वेगीं पाय दे गोपाळा । भीमकबाळा बोलीली ॥ ५९ ॥

हें झालें रुक्मिणीच्या नांव घेण्याचें वर्णन. तसेंच पुढें कृष्णाबद्दल—

रेवती म्हणे जी यादवा । आधिं घ्या ईचीया नांवा ।
हळदी मग ईसी लावा । देवाधिदेवा श्रीकृष्णा ॥ ८८ ॥

कृष्ण म्हणे हळदीनिमित्तें । मजाचि लावूं आल्याति पिसें ।
नांवरूप मज दिसे । काय मीं कैसें म्हणावें ॥ ८९ ॥

नांवरूपाची व्यवस्था । रुक्मिणी जाणें तत्त्वतां ।
माझ्या अंगीं नाहीं सर्वथा । नांव घेतां मी नव्हे ॥ ९० ॥

कृष्ण म्हणे रुक्मिणी देवी । नामरूपें तूंचि अघवी ।
मजपरिस तूंचि बरवि । हांसि जे सर्वि ऐकोनी ॥ ९३ ॥

एकनाथरचित 'हळदुली' म्हणून छोट्याशा काव्यभागांत या हळद-प्रसंगाचेंच वर्णन आहे. "एका वृद्धेनें नांव घे म्हणून सुचविलें तेव्हां कृष्ण नामरूपातीत आहे—जेथें रूपाचा दुकाळू । नामाचा विटाळू ।—तेव्हां त्याचें नांव कसें घ्यावें हा प्रश्न रुक्मिणीस पडला. तेव्हां तो गो ( इंद्रिय ) नियंता आहे हें आठवून तिनें "गोपाळा! पाय द्या" असे म्हटलें. पुढें कृष्णाला नांव घेण्यास सर्वांनीं सांगतांच त्यानेंहि "नामा हे रूपाची। गुणमयी गुणाची ॥" रुक्मिणीचें नांव घेण्याची मला लाज कशाची ? इत्यादि अर्थाचें नांव घेऊन वेळ पार पाडली.*

वरील दोन्ही ग्रंथांचें उद्दिष्ट कथानकाबरोबर वेदांतपरिचय हेंहि आहे व त्यामुळें नामरूपांचा व्याकर्ता, गो म्हणजे इंद्रियांचा नियंता, अशा तऱ्हेच्या परिभाषेनें सर्व वर्णन गुंफलें आहे. परंतु वधूवरांनीं एकमेकांचीं "नांवें घेणें", तीं घेतांना विशिष्ट तऱ्हेची शब्दरचना करून तीमध्यें तीं नांवें गुंफणें ह्या पद्धतीचें अस्तित्व यावरून स्पष्ट कळतें. वेणीस्वामीकृत सीतास्वयंवरांत पुढील उल्लेख येतो:—

तव कौसल्येच्या वऱ्हाडणी । म्हणती गे सुलक्षणी ।
नमस्कारितां चापपाणि । नाम उच्चार करावा ॥ ४२ ॥

काय बोले मनोरमा । प्राणवल्लभा रघोत्तमा ।
उणें करूं दे सुखधामा । म्हणोनि पाउलें वंदिलीं † ॥ ४३ ॥

जनकनंदिनी नमस्कार । करितां नामाचा उच्चार ।
ते समई जयजयकार । सकळांचे दाटले ॥ ४४ ॥

---

* पांगारकरकृत वाङ्मयाचा इतिहास–भाग २ रा–एकनाथ खंड, पान ३०४.

† उटणें करावया सुखधामा । प्राणवल्लभा रघोत्तमा ।
द्यावें पाउलां उत्तमा । विनवी भाजा आपुली ॥
अशा तऱ्हेचा कांहीं उखाणा असावा—शं. कृ. देवकृत टीप.

प्रस्तुत काळांतील नांव घेऊन पाय मागण्याच्या या उखाण्याचें स्वरूप पुढील प्रकारचें असतें:—

" अंधाऱ्या रात्रीं चमकला काजवा, 'शंकरराव' पाय द्या उजवा."

वरील उदाहरणावरून पुढील गोष्टी प्रत्ययास येतात:—

(अ) नित्याच्या व्यवहारांत नवराबायको परस्परांचे नांवाचा उल्लेख करीत नसत.

(आ) नैमित्तिक प्रसंगीं उत्सवसमारंभांत नांव घेत असत.

(इ) परंतु तें घेतांना कांहीं चमत्कृतिजन्य, लयबद्ध व सयमक अशी वाक्यरचना करून त्यांत त्या नांवाची गुंफण करीत.

या विशिष्ट तऱ्हेनें रचलेल्या शब्दगुंफेचा निर्देश "आहाणा" व "उखाणा" या दोन शब्दांनीं केला जात असावा. "उखाणा" हा शब्द आज प्रचलित आहेच. "आहाणा" शब्द जुन्या वऱ्हाडी बोलींत प्रचलित होता.* हे दोन्ही शब्द इतर अर्थानेंही भाषेंत रूढ आहेतच.

आहाणा (आह् = बोलणें) हा शब्द म्हण, वचन, उक्ति, कूटप्रश्न, दृष्टांत अशा अर्थीं वापरलेलाहि जुन्या वाङ्मयांत सांपडतो. त्याचप्रमाणें उखाणा (उत् + खन् = खणून काढणें) हा शब्दहि कोडें, कूटप्रश्न, दृष्टांत, म्हण या अर्थीं उपयोजिलेला आहे.

धात्वर्थास धरून पाहतां "आहाणा" हा शब्द म्हण, वचन, उक्ति या अर्थाचा वाचक होणें स्वाभाविक वाटतें. त्याचप्रमाणें "उखाणा" हा शब्द कूटप्रश्न, कोडें या शब्दांचा वाचक व्हावा हें स्वाभाविक वाटतें. कारण कूटप्रश्नांत उत्तर लपलेलें असून तें श्रोत्यानें शोधून

---

* तो आहनि मधुर बोलुन नांव साचे।
बोले मधुर रचना रद-कांति हांसे॥ —कै. बा. गो. पाटील यांची अप्रसिद्ध कविता.

"विविधज्ञानविस्तार", वर्ष ५९, अंक ३४, पृ. ३.

म्हणजे उत्खनन करून काढावें लागतें. उदाहरणार्थ, "बत्तीस चिरे त्यांत नागीण फिरे" हा उखाणा म्हणजे कूटप्रश्न असून त्यांतून अर्थानुरोधानें तोंडांतील बत्तीस दांत व त्यांतील जीभ हा अर्थ ओळखून काढावा लागतो. तेव्हां कोड्यांना 'उखाणा' हा शब्द समर्पक वाटतो. तशाच प्रकारें 'उखाणा' हा शब्द म्हण, लोकोक्ति, वचन, सुभाषित अशा अर्थी जुन्या स्त्रियांच्या बोलींत वापरलेला मीं ऐकलेला आहे. उदाहरणार्थ, एखाद्या बाईच्या तोंडीं म्हणी फार असतील – आणि अशा पुष्कळदां असतात– तर तिचें वर्णन करतात, "काय ती बाई सारखे उखाणे घालीत बोलते. म्हणे 'मला न्हाणा व विहिणीला खंगाळा' किंवा 'अहो नंदी कशाचे, तर आपण देव पाषाणाचे.' असे सारखे तिच्या तोंडांत उखाणे."

'आहाणा' व 'उखाणा' ह्या शब्दांतील धात्वर्थावरून प्रत्येक शब्दाचें क्षेत्र स्वतंत्र असलें तरी रूढीनें ते दोन्ही शब्द एकमेकांचें काम करतात असें दिसतें. शिवाय नवराबायकोनीं परस्परनामनिर्देश करतांना उपयोगांत आणावयाच्या शब्दगुंफेचा निर्देश या दोन्ही शब्दांनीं केला गेलेला दिसतो. 'आहाणा' हा शब्द जास्त जुना, वऱ्हाडकडील भाषेंत शिल्लक राहिलेला व 'उखाणा' शब्द सध्यां प्रचलित असलेला. तरी-पण प्रथम सरसकट 'आहाणा' शब्द प्रचारांत होता व मागून त्या जागीं 'उखाणा' शब्द आला कीं काय हें निश्चित सांगणें कठीण आहे. तरीपण हे शब्द प्रथम या शब्दगुंफेस कां लागूं लागले याची उपयोगा-वरून थोडीशी कल्पना येते.

'आहाणा' म्हणजे म्हण. म्हणीमध्यें अंत्ययमक व लयबद्धता असते तशी या 'उखाण्यांत' हि असते. त्यावरून म्हणीप्रमाणें म्हणून 'आहाणा' शब्द इष्ट वाटला असावा. नवऱ्याचें नाव तर घ्यावयाचें नाहीं पण लोकांस कळेल असें करावयाचें. तेव्हां अशी कांहीं रचना असावी कीं, तींतून तें पर्यायानें, वक्रोक्तीनें, दृष्टांतानें ऐकणाराला कळावयाचें, म्हणजे नांव गुंफणारीचा चतुरपणा त्यांत दिसावा. शिवाय शोधून काढणारालाहि त्यांत कोडें ओळखण्याप्रमाणें खटपट पडावी व

म्हणून या रचनेस ‘उखाणा’ हेंहि नांव योग्य वाटून तें उपयोगांत आलें असावें.

रुक्मिणीहरणांत रुक्मिणीला नांव कसें घ्यावें हा प्रश्न पडला व तिनें प्रत्यक्ष कृष्ण न म्हणतां गो–इंद्रियांचा नियंता या अर्थी “गोपाळ” हा शब्द उच्चारला व पर्यायानें कृष्ण हा अर्थ लोकांना कळला असें वर्णन येतें. अशाच प्रकारचें दुसरें उदाहरण म्हणून जरी नव्हे तरी उखाण्याचें स्वरूप कसें असूं शकेल ही कल्पना येण्यास “औषध नलगे मजला” ही ओळ पाहण्यास हरकत नाहीं.

“ती शीतलोपचारी जागी झाली बरें म्हणुन बोले
‘औषध नलगे मजला’ परिसुनि जननी बरें म्हणुनि डोले ॥

या रघुनाथपंडितांच्या सुप्रसिद्ध श्लोकांत “नल” हें नांव श्लेषाचे मदतीनें सुचविलें आहे व तें उकलून समजून घेण्याचें काम दयमंतीच्या मैत्रिणींचें आहे. उखाणा हा शब्द रूढ होतांना ही कल्पना असावी, परंतु आज व्यवहारांत प्रचलित असलेल्या—

शब्दगुंफांचें स्वरूप आहे ‘आहाणा’*
पण म्हणतात त्याला ‘उखाणा’.

---

* उखाण्याचें अर्वाचीन वाङ्मयांत समाविष्ट झालेलें उदाहरण सौ. आनंदीबाई कर्वे यांच्या “माझें पुराण” या आत्मवृत्तांत सांपडतें. पृ. २७.

“सदनाचे मजवर उपकार झाले फार ।
‘आनंदीनें’ फेडायला असावें तयार ॥”

# बैठकींतील गाणीं : : ७

हीं अमुकच एका प्रसंगीं म्हणावयाचीं असें नव्हे. पण स्त्रिया एकत्र जमल्या म्हणजे· विशेषतः मंगळागौरीसारख्या प्रसंगीं—रात्रीं जागरण करीत असतां—हीं गाणीं म्हटलीं जातात. यांत कथानकाला महत्त्व असून सुरस चाल, अनुरूप शब्दरचना, इत्यादि काव्याच्या सर्व अंगोपांगांकडे लक्ष दिलेलें असतें. रसपरिपोषहि चांगल्या तऱ्हेनें झालेला सांपडतो. उदाहरणार्थ,

"शरद् ऋतू उदय चंद्राचा ।
वनीं वृंद उभा गौळणिंचा ।
सूगंध सुटत पवनांचा ।
ये पवन मलयगिरिवरचा ।
हा थाट उभा रासाचा ।
धरुनियां हस्त राधेचा ।
(चाल) श्रीरंग कुठें अजि दावा ।
हृदयिंचा तो प्राणविसांवा ।
(चा. प.) मुरलीधर कुणि तरी दावा ।
हृदयिंचा तो प्राणविसांवा" ॥ ध्रु. ॥

हें सुंदर गाणें रचणारी व्यक्ति नुसती कविच नसून संस्कृत काव्य-शास्त्रांतहि पारंगत असल्याचा भास होईल. कवींची स्त्रीगीतांना फार मोठी मदत झालेली आहे. उदाहरणार्थ, उद्धव चिद्‌घनाचें पुढील पद पहा :—

" कृष्णा धांव रे लवकरी । संकट पडलें भारी ॥
हरि तूं आमुचा कैवारी । आलें विघ्न निवारी " ॥

भक्तिरसपूर्ण गाण्यांचा समुदायहि मोठा आहे. पुष्कळ ठिकाणीं कवयित्रीनें वा कवीनें शेवटीं आपलें नांवहि गुंफलें आहे. तेव्हां 'याला अपौरुषेय म्हणावयाचें तर तीं स्त्रियांच्या समुदायांत प्रामुख्यानें गायिलीं जातात म्हणून. डोहाळे, दृष्ट, धांवे, असलीं सर्व गाणीं यांत येतात.

# अपौरुषेय ओवी : : ८

बैठकींतील गाण्यांकडे धांवता दृष्टिक्षेप करून आपण "अपौरुषेय वाङ्मयाचा" गाभा जें श्राव्य ओवी–वाङ्मय तिकडे येऊन पोंचलों. आंतील विषयावरून ओवीचे दोन प्रकार होतात: लहान मुलींच्या म्हणण्यांत येणाऱ्या; झोंपाळ्यावर बसून म्हणतांना व इतर वेळींही मनोरंजनार्थ यांचीं आवर्तनें होतात. दुसरा प्रकार म्हणजे मोठ्या स्त्रियांनीं तसेंच सासुरवाशिणींनीं व माहेरवाशिणींनीं दळणाचे वेळीं जात्यावर बसून म्हटलेल्या, मुलांना निजवितांना म्हटल्या जाणाऱ्या व मंगल प्रसंगीं गायिलेल्या ओव्या. या वेळीं म्हटली जाणारी ओवी मनोरंजनार्थ तर खरीच, परंतु त्यांत बाल्य-सुलभ अवखळपणापेक्षां भावदर्शन जास्त होतें. येथें अमक्या वेळीं अमुक ओवीच म्हणावी हें बंधन नसलें तरी गाणारीच्या मानसिक अवस्थेमुळें आपोआप फरक होतो.

पद्यरचनेंतील ही अर्थप्रधान तिसरी अवस्था. प्रत्येक ओवींत कांहीं तरी निश्चित "वक्तव्य" असतेंच. पण पूर्वपरंपरा अगदींच सुटत नाहीं. ओळींच्या चार चरणांपैकीं पुढच्या दोन चरणांत म्हणजे उत्तरार्धांत अर्थ हवाच; व पहिल्या दोन ओळींत म्हणजे पूर्वार्धांत कांहीं अर्थ असला तरी त्याची पुढच्याशीं सुसंगतता हवीच असें

मात्र नाहीं. किंबहुना पूर्वार्धाचा व उत्तरार्धाचा अंत्य यमकापुरताच संबंध. उदाहरणार्थ,

मुंबईची मुंबादेवी, तिची सोन्याची कंबर ।
निरी पडली शंभर, पैठणीची ॥

किंवा काळी चंद्रकळा, ठेविली बांकावरी ।
रुसली काकावरी, यमूताई ॥

यांत "सोन्याची कंबर" असणें व "शंभर निरी पडणें" यामध्यें कार्यकारणभाव नाहीं. किंवा "बांकावरी" चंद्रकळा ठेवण्याचें कारण "काकावरी" या शब्दाशीं यमक जुळविण्यापुरतेंच. आणि अशा तऱ्हेची संवय पूर्वपरंपरेनें पडली तरी ती रूढि होऊन टिकण्यास, ओव्या म्हणतांना—विशेषतः झोंपाळ्यावर—ज्या शीघ्रकवित्वाची मदत घ्यावी लागते तेंहि थोडेंबहुत कारणीभूत झालें असावें. झोंपाळ्यावर बसून मुली ओव्या म्हणतात व दोन बाजूंचे दोन पक्ष करून एक ओवी एका पक्षानें म्हणावी व त्यापुढची दुसऱ्या पक्षानें म्हणावी अशा चढाओढी चालतात. या वेळीं एकाच तऱ्हेच्या ओव्या कोण जास्त म्हणतें याबद्दल चढाओढी लागतात. एकदां 'काळी चंद्रकळा' या प्रतीकानें ओवी सुरू झाली कीं त्याच सारख्या म्हणावयाच्या; ज्या बाजूला अशा ओव्या म्हणतां येणार नाहींत त्या बाजूवर दुसऱ्या बाजूचा चढ लागतो. तेव्हां भराभरा ओव्या बनूं लागतात.

व काळी चंद्रकळा, ठेविली जाईवरी ।
रुसली आईवरी, उषाबाई ।
काळी चंद्रकळा, ठेविली दारावरी ।
रुसली दीरावरी, उषाबाई ।

अशा विटाळाच्या काव्याला सुरवात होते. नाहींतर ओवी आठविण्यास जरा वेळ लागला कीं विरुद्ध बाजूच्या मुली ओवी म्हणतात,

चांदीच्या ताटांत, डाळिंबाचा दाणा ।
आतांतरी म्हणा, मनूताई ॥

ही ओवी म्हणून होईपर्यंतहि जर ओवी आठवली नाहीं तर पुढें ओवी म्हटली जाई ती ही—

चढावरी चढ, असा चढ घालूं नये ।
चिजवराला देऊं नये, मनुताईला ॥

यामुळें पहिली ओळ छापील ठशाची, फक्त सोयीप्रमाणें अंत्य यमकाचा शब्द बदलून घ्यावयाची, व पुढच्या ओळींत आपलें मनोगत व्यक्त करावयाचें अशी रूढि पडली. 'कोल्हटकर' व 'गडकरी' यांनीं यंत्राचे मदतीनें काव्याच्या बाजारांत काव्याचे विकाऊ घाऊक घाट दागिन्याच्या घाटांप्रमाणें मिळतील म्हणून चेष्टा केली. पण अपौरुषेय वाङ्मयांत ओवी-विभागांत हे काव्याचे घाट तयार असून लोकप्रिय झाल्यानें त्यांना मागणीहि फार असें दिसतें. "काळी चंद्रकळा" या लोकप्रिय घाटाप्रमाणेंच "लांब लांब केस", "उंचेच्या ओसरीला", "रामकुंडावरी", "आधीं नमन करूं", इ. अनेक घाट तयार असून उपयोगांत आहेत. ठराविक सांचा, प्रत्येक ओवी वेगळ्या व्यक्तीनें रचिलेली, ओवीचा चिमुकला जीव, प्रथम कोणती म्हणावी, मागून कोणती म्हणावी, असेंहि बंधन अर्थात् नसतें; कारण तें एक आख्यान नव्हे. पण असें असूनहि केव्हां एखादें वर्णन फार सुरस होतें. पुढील उदाहरण या दृष्टीनें पाहण्याजोगें आहे. बायकांच्या ज्या कांहीं विशिष्ट आवडीनिवडी ओव्यांवरून कळतात त्यांपैकीं "मोठे मोठे डोळे", "लांब लांब केस", "गौरीचं गोरेपण", "काळी चंद्रकळा" या कांहीं होत. "काळी चंद्रकळा" प्रत्येकीला हवीच. पुढील ओव्या एकामागून एक म्हटल्यास ह्या आवडीची कल्पना येते:—

## काळ्या चंद्रकळेचें आख्यान

काळी चंद्रकळा, रुइफुली कांठाची । बुधवार पेठेची खरेदी केली ॥
काळी चंद्रकळा, पदरीं रामसीता । नेसली पतिव्रता, उषाताई ॥
काळी चंद्रकळा, पदरीं रामबाण । नेस तुला माझी आण, उषाताई ॥

अशी चंद्रकळा विकत आणली पण कुणीं ती योग्य ठिकाणीं ठेविली नाहीं म्हणून नेसणारीला राग आला.

काळी चंद्रकळा, ठेविली जाईवरी । रुसली आईवरी, उषाताई ॥
काळी चंद्रकळा, ठेविली बांकावरी । रुसली बापावरी, उषाताई ॥
काळी चंद्रकळा, ठेविली पारावरी । रुसली दीरावरी, उषाताई ॥
काळी चंद्रकळा, धुवुधुवूनी झाली मऊ । रुपये दिले साडे नऊ,
दादारायांनीं ॥
काळी चंद्रकळा, धुवुधुवूनी झाला कात । रुपये दिले साडे सात,
दादारायांनीं ॥
काळी चंद्रकळा, धुवुधुवूनी झाला बोळा । रुपये दिले साडे सोळा,
दादारायांनीं ॥

इतके पैसे दिले तरी शेवटीं विटली म्हणून नेसणारी म्हणते :—

काळी चंद्रकळा, धुवुधुवूनी विटली । नाहीं हाउस फिटली, माझ्या
मनिंची ॥

तेव्हां मैत्रिणीनें सांगितलें, "धुवुधुवून" विटते तर "ठेवून ठेवून" नेसत जा.

काळी चंद्रकळा, ठेवुठेवून नेसावी । आपल्या जन्माला असावी,
उषाताई ॥

जन्माला काळी चंद्रकळा पुरावी इतकी आवड.

एखादी नवीन गोष्ट पाहण्यांत आली तर नवलाईनें तिचें वर्णन करणें, एखादी नवी न पटणारी गोष्ट दिसली तर तीवर टीका करणें, हा मनुष्यस्वभाव स्त्रियांतहि* उत्कटतेनें प्रतीत होतो. आगगाड्या, तारायंत्रें, पाण्याचे नळ, मुलींच्या शाळा, इंग्रजी शिक्षण, इ. गोष्टी नव्यानें सुरू झाल्या त्या वेळीं वाटलेलें कौतुकहि ओव्यांत सांपडतें.

---

* झिम्मा खेळतांना म्हटलें जाणारें पुढील गाणें या दृष्टीनें पाहण्याजोगें आहे :—

"काय बाई पुण्याची तारीफ । लवंगा निघाल्या बारीक ॥
टोपीवाल्याचा मुलूख । आगिनगाडीला कुलूप ॥
साहेब बसले घरांत । मडमा बसल्या दारांत ॥

## आगिनगाडीचें आख्यान

आगिनगाडी सुरू झाली, पुण्याला ऐकूं गेली ।
मुंबईला सुरू केली, इंग्रजांनीं ॥
आगिनगाडी, बिगिनगाडी, आगिनगाडीला कप्पे कप्पे ।
आंत बसले माझे सख्खे, भाईराज ॥
आगिनगाडी, बिगिनगाडी, आगिनगाडीला डब्बे डब्बे ।
बैलावीण चाले निघे, रुळावरी ॥

या ओव्यांवरून श्री. लक्ष्मीबाई टिळक यांचें 'स्मृतिचित्रां'तील वाक्य आठवतें. "मी आगगाडी पाहिली नव्हती. माझी आपली कल्पना कीं, आगगाडीचे डबे लाडवांच्या डब्यासारखे असतात आणि आंत माणसें बसवून वरून झांकण लावतात." अशा अर्थांचे त्यांचे उद्गार आहेत; त्याची आठवण येऊन त्या वेळच्या स्त्रीला 'आगिनगाडीचे कप्पे' व त्यांत बसणाऱ्या भावाचें कौतुक किती वाटत असेल याची कल्पना येते.

पुढें मात्र आगगाडीचा सराव होऊन नवल जातें. पण कौतुक राहतें. सिग्नल पाडणाऱ्याची बहीण कौतुकानें म्हणते—

आली आगीनगाडी, दिसती काळी निळी ।
बंधुनं ढासळली, शिनगळा तुझी फळी ॥

पाण्याच्या नळाचें वर्णन असेंच केलेलें आढळतें:—

कोल्हापूर शहर, गल्लोगल्लीं नळ ।
पाण्याचे केले खेळ, इंग्रजांनीं ॥

तसाच जातां जातां सहज केलेला उपदेश पहा:—

किती मी सांगूं तुला, गळा पदर घ्यावा नीट ।
गोरेपणाला होय दृष्ट, उषाताई ॥
किती मी सांगूं तुला, गळा नीट घे पदर ।
परक्या पुरुषाची, जाते नजर दूरवर ॥

# काव्यशास्त्रदृष्ट्या परीक्षण : : ९

आतांपर्यंत ‘अपौरुषेय वाङ्मयाच्या’ बहुतेक विभागांचें सामान्य निरीक्षण झालें. आतां या विभागांत पद्याच्या परिणतावस्थेला पोंचलेला जो विभाग त्याचें म्हणजे मुख्यतः ओवी–विभागाचें काव्यशास्त्राच्या मदतीनें परीक्षण करून पाहणें मनोरंजक होईल. इतर विभागांतील म्हणजे फेरांच्या गाण्यांतहि जेथें कसोटी लावतां येणें शक्य होतें तीं गाणींहि येथें विचारांत घेतलीं आहेत.

मराठी भाषेचें स्वतंत्र असें काव्यालोचनशास्त्र अजून निर्माण झालें नाहीं, तेव्हां संस्कृत काव्यशास्त्राचे मदतीनें याचें परीक्षण करणें आहे. सर्व भाषांतील साहित्यशास्त्राचीं मूलतत्त्वें एकच असल्यानें असें परीक्षण अगदींच टाकाऊ होणार नाहीं; शिवाय त्या चर्चेंत मराठी भाषेचा विशिष्ट स्वभाव व्यक्त होऊन संस्कृत भाषेंतील कोणत्या गोष्टी तिला मानवतात, कोणत्या गोष्टी तिच्या छत्राखालीं फुलून येतात व कोणत्या गळून पडतात, हेंहि त्यांत स्पष्ट होऊन आगामी शास्त्ररचनेला तें उपयुक्त होऊं शकेल. संस्कृत साहित्यशास्त्रांत ‘मम्मटाचा’ ‘काव्यप्रकाश’ ग्रंथ जरी सर्वमान्य असला, तरी काव्याची व्याख्या मात्र साहित्यदर्पणकार ‘विश्वनाथ’ याचीच योग्य आहे. कारण व्याख्या करतांना नुसतें काव्य-शरिराचें वर्णन करून त्यानें आत्म्याचा उल्लेख केला नाहीं व म्हणून

निर्जीव ठरलेल्या व्याख्येला विश्वनाथाच्या व्याख्येचे मदतीनें जीवन पुरवावें लागतें. दोनही व्याख्या एकदम घेतल्या म्हणजे मात्र काव्य-देवतेच्या जागरूक मूर्तीचें दर्शन होतें.

( १ ) तददोषौ शब्दार्थौ सगुणावनलंकृती पुनः क्वापि ।–मम्मट.

( २ ) वाक्यं रसात्मकं काव्यम् ।–विश्वनाथ.

या दोन व्याख्यांचे अनुषंगानें या वाङ्मयाचे गुण, दोष, अलंकार व रस यांचें परीक्षण होणें इष्ट आहे.

**गुण** :—मम्मटानें मानिलेल्या गुणांपैकीं प्रसाद व माधुर्य हे गुण या ओवी-विभागांत भरपूर आहेत. ओजस् हा गुण वीर, रौद्र, भयानक व बीभत्स या रसांस अनुकूल असतो. प्रस्तुत वाङ्मयांत या रसांचा प्रकर्ष नाहीं. तेव्हां ओजस् गुणाचा अभाव स्वाभाविक वाटतो.

**अपुष्टार्थतेचा ठळक दोष** :—दोषाबद्दल एवढेंच तूर्त म्हणतां येईल कीं, एकदम डोळ्यांत भरणारा दोष म्हणजे अपुष्टार्थता. पहिल्या ओळीचा व दुसऱ्या ओळीचा संबंध अर्थासाठीं नसून यमकासाठींच आहे असा जणुं संकेत ठरल्यानें पहिल्या ओळीचा उपयोग भरताडा-सारखा वाटतो. उदाहरणार्थ—

पंढरपुरीच्या, माळिणी ठेंगण्या ।
फुलांच्या कंगण्या, रुक्मिणीला ।।
पंढरपुरीच्या, माळिणी उंच काळ्या ।
फुलांच्या चिंचपेट्या, रुक्मिणीला ।।

या ठिकाणीं पंढरपूरच्या माळिणीच्याबद्दल कांहीं सांगणें अभिप्रेत नाहीं. पहिल्या ओवींतील 'ठेंगण्या माळिणी' दुसऱ्याच ओळींत एकदम 'उंच' कां होतात? तर 'ठेंगण्या–कंगण्या' 'उंच काळ्या' व 'चिंच-पेट्या' हें यमक जुळावें म्हणून. अर्थव्यक्तीसाठीं आंखून घेतलेल्या प्रदेशापैकीं असा निम्मा भाग भरताडाखालीं खर्च करणें इतर काव्यांत खपणार नाहीं. पण या वाङ्मयांत हा अलिखित संकेत ठरल्यानें हा ओवीचा स्वभाव मानून दोषात त्याची गणना करतां येणार नाहीं.

सांगणारीच्या मनांत सांगावयाचें पुष्कळ असलें, म्हणजे मागच्या जागेंतील हे भरताड आपोआप दूर होऊन ती जागा अर्थव्यक्तीसाठीं उपयोगांत येते. उदाहरणार्थ—

बाप पुसे लेकी, सासुरवास कसा।
वळचणीचा वासा, लागतो ठसाठसा ॥

हें सासुरवासाचें समर्पक वर्णन.

दुसरें उदाहरण—

लेकी नेल्या चोरीं, लेक नेले घारीं।
परदेशी म्हातारी, घरामध्यें ॥

मुली आपापल्या घरीं गेल्या, मुलगेसुना यांचा संसार सुरू झाला; यामुळें त्यांचे लक्ष साहजिक पुढें वेधतें व त्यामुळें घरांतील म्हातारें मनुष्य एकलकोंडें होतें. याचें हें थोड्या शब्दांत फार सुंदर वर्णन आहे.

या ओव्यांत एकहि शब्द निरर्थक नसून अर्थ कसा ठेंचल्यासारखा वाटतो. अशा ओव्यांचे ठिकाणीं वाटल्यास "अर्थप्रकर्ष" हा वेगळाच गुण मानावा.

## सादृश्याधिष्ठित अलंकार

वर्णन करतां करतां चमत्कृति निर्माण होऊन घडलेले अलंकार येथें पुष्कळ; मुद्दाम पांडित्यदर्शनासाठीं घडविलेले अलंकार क्वचित् व ओवीच्या चिमुकल्या घटनेंत ते बसण्यालाहि फारसा वाव नाहीं. सादृश्याधिष्ठित अलंकार फार. विरोधगर्भ, शृंखलाबंध, तर्कन्याय, वाक्यन्याय, लोकन्याय, आदि न्यायमूलक म्हणजे विभावना, विशेषोक्ति, श्लेष, समासोक्ति, काव्यलिंग, प्रत्यनीक, समाधि, असले अलंकार दुर्मिळ. उपमा-दृष्टांत विपुल. रूपक, उत्प्रेक्षा, प्रतिवस्तूपमा, अर्थान्तरन्यासहि आढळतात. नमुन्यादाखल पुढील उदाहरणें पुरेशीं होतील :—

उपमा :—( साधर्म्ये उपमा भेदे। )

मोठे मोठे डोळे। हरीण पाडसाचे
तसे माझ्या राजसाचे। बाळुरायाचे ॥

आपण बोलूं गुज । डाळिंबीसमान ॥
तूं भाऊ मी बहिण । जडे नातें ॥

रूपक :—( तद्रूपकं अभेदो य उपमानोपमेययोः । )

तुझ्या जीवासाठीं । उभी राहिलें वनांत ।
माझ्या बंधुराया, । तूंच शेला मी बनात ॥
माझे पांच भाऊ । देवळाच्या भिंती । ✓
गिलावा देऊं किती । आयुष्याचा ॥ ✓
आम्ही तिघी बहिणी । तीन गांवच्या तीन पेठा ।
माझा बंधुराया । मला 'सातारा' दिसे मोठा ॥

उत्प्रेक्षा :—( संभावनमथोत्प्रेक्षा प्रकृतस्य समेन् यत् । )

गोऱ्या गालावर । मुलामा लाल लाल ।
जणुं गुलाबाचें फूल । शोभिवंत ॥
वनदेवतांचे । काजवे जणुं डोळे ।
बघाया बाळ माझें । त्यांनीं रात्रीं उघडिले ॥

प्रतिवस्तूपमा :—( सामान्यस्य द्विरेकस्य यत्र वाक्यद्वये स्थितिः । )

दूरच्या देशीचा । शीतळ वारा आला ।
सुखी मी आयकीला । भाऊराया ॥
आधणाचें पाणी । ओतीतें विसावण ।
पतीच्या रागांत । मिसळतें प्रेमगुण ॥

दीपक :—( सकृद् वृत्तिस्तु धर्मस्य प्रकृताप्रकृतात्मनाम् । )

नक्षत्रीं आकाश । फुलांनीं फुलवेल ।
भूषणीं शोभेल । उषाताई ॥

निदर्शना :—( अभवन्वस्तुसंबंध उपमा परिकल्पकः । )

पाठच्या बहिणीवरी । भाऊ का संतापेल ।
चंद्र आग का ओकेल । कांहीं केल्या ॥

**अप्रस्तुतप्रशंसा** :—( अप्रस्तुतप्रशंसा या सा सैव प्रस्तुताश्रया । )

शेवंती फुलली, वास कोणाला ग आला ॥
उद्दाम केवडा । चिर्दी दरवळत गेला ॥

( मुलींचे खेळ नाजूक व मुलांचे दांडगाईचे असतात हें शेवंती व केवडा या अप्रस्तुत गोष्टींच्या वर्णनानें सुचविलें. )

**दृष्टान्त** :—( दृष्टान्तस्तु सधर्मस्य वस्तुनः प्रतिबिंबनम् । )

पाऊस कीं पडे । मृगाआधीं रोहिणीचा ।
भावाआधीं बहिणीचा । संवसार ॥
वळवाचा पाऊस । पडून ओसरला ।
भावाला झाल्या लेकी । मग बहीण विसरला ॥
बहिण भावंडांची । त्यांच्या पोटामधीं माया ।
फोडिलं सीताफळ । आंत साखरेची काया ॥

**अर्थान्तरन्यास** :—( सामान्यं वा विशेषो वा तदन्येत समर्थ्यते )

फोडिलं चंदन । त्याच्या केल्या बारा फोडी ।
स्त्रियांची जात वेडी । पुरुषांना माया थोडी ॥
भांडते झगडते । एकाचे एक होते ।
मारून कां कधीं काडी । पाणी तुटतें वहातें ॥

एकंदरींत गम्यसादृश्य असे अलंकार फार. सर्वच अलंकार देणें शक्य नाहीं.

येथें दिसून येणाऱ्या उपमानविषयांकडे दृष्टि टाकणें मनोरंजक आहे. एक प्रकारें संस्कृत साहित्यशास्त्रीय विद्वत्तेपासून हें वाङ्मय स्वतंत्रपणें वाढल्यासारखें वाटतें. कारण संस्कृत काव्यांत पाय अडखळण्याइतक्या विपुलतेनें सांपडणारी 'कमळाची' व 'चंद्राची' उपमा येथें क्वचित् सांपडते. तशाच इतर कविसंकेतांमुळें ठरलेल्या हरिण, भ्रमर, इ. उपमाहि थोड्याच. पुढील ओव्यांतील उपमानविषय व प्रसंग अस्सल स्त्री-साम्राज्यांतील आहेत असें म्हणतां येतें :—

आपण बोलूं गुज, डाळिंबी समान।
तूं भाऊ मी बहिण, जडे नातें॥
आधणाचें पाणी, त्यांत भात शिजवितें।
रुसवे, फुगवे, त्यांत सुख पिकवीतें॥
आधणाचें पाणी, ओतीतें विसावण।
पतीच्या रागांत, मिसळते प्रेमगुण॥
दुध वर येतां, पाणियानें खालीं जाई।
कंथाचा ग राग सखी, हंसण्यानें नष्ट होई॥
* कस्तुरींत पडली, हिंगाची चिटी।
बिगडली सोन्याची भटी॥

---

* फेराच्या गाण्यांतील दृष्टांत. (चिटी = चिमुट)

# रसाविष्कार : : १०

येथपर्यंत काव्यदेवतेच्या बाह्य स्वरूपाचें वर्णन झालें. आतां आत्मा जो रस त्याचें दर्शन घ्यावयाचें.

शृंगारहास्यकरुणरौद्रवीरभयानकाः ।
बीभत्साद्भुतसंज्ञौ चेत्यष्टौ नाट्ये रसाः स्मृताः ॥

भरतानें आठ रस मानले. परंतु त्याचे मागून येणाऱ्या साहित्य-शास्त्रज्ञांनीं कांहींनीं ‘ शांत ’ व कांहींनीं ‘ वात्सल्य ’ हा नववा रस मानला. मराठी वाङ्मयांत ‘ भक्ति ’ रसाला स्वतंत्र स्थान दिलें पाहिजे, असें हल्लींचे साहित्यशास्त्रज्ञ डॉ. जोग, वाटवे, केळकर, इ. मंडळींना वाटतें व तें मत मान्यता पावत आहे. रससंख्या किती मानावी हा आजचा प्रश्न नाहीं. फक्त प्रस्तुत वाङ्मय-विभागांत आपणांस कोणते रस सांपडतात येवढेंच पाहणें आहे. उपरिनिर्दिष्ट रसांपैकीं रौद्र, वीर, भयानक, बीभत्स या रसांचा येथें अभाव दिसतो. शृंगार रसांत उत्कटता आहे पण उत्तानता नाहीं. ‘ हास्य ’, ‘ अद्भुत ’ हे लहान मुलींकडून म्हटल्या जाणाऱ्या ओव्यांत जास्त प्रमाणांत सांपडतात. कारुण्य, वात्सल्य व भक्ति यांनीं भरलेल्या ओव्या फार.

भोंडल्याच्या गाण्यांत हास्य व अद्भुतरस विशेष सांपडतो. वानवळाच पहावयाचा तर पुढील :—

## झिपरं कुतरं

"झिपरं कुतरं सोडा ग बाई ।
दारिं कोण पाहुणा आला ग बाई ।
चारी दरवाजे लावा ग बाई ॥ ध्रु० ॥
सासु पाहुणी आली ग बाई ।
सासूनं काय आणलंन् ग बाई ।
सासूनं आणल्या पाटल्या ग बाई ॥
(चा. ब.) पाटल्या मी घेत नाहीं ।
संगं मी येत नाहीं ।
(चा. प.) झिपरं कुतरं सोडा ग बाई ।
चारी दरवाजे लावा ग बाई ।
दारिं कोण पाहुणा आला ग बाई ॥ १ ॥"

सासरहून बोलावणें घेऊन येणाऱ्या सासरा, दीर, जाऊ, नणंद, इत्यादि सर्वांची याप्रमाणें बोळवण झालेली पाहून या अभिनव 'झांशीवाली' मुळें हा वीररस निर्माण झाला, असें जों ऐकणाऱ्याच्या मनांत येतें, तोंच स्वतः पति बोलवावयास येतो. त्याबरोबर

"पती पाहुणा आला ग बाई ।
पतीनं काय आणलंन् ग बाई ।
पतीनं आणला चाबुक ग बाई ॥
(चाल) चाबुक मी घेतें ।
संगं मी येतें ।
(चा. प.) झिपरं कुतरं बांधा ग बाई ।
चारी दरवाजे उघडा ग बाई ॥" असा स्वर बदलतो.

त्राटिकेचा अवतार संपतो आणि आज्ञाधारक पत्नीच्या भूमिकेला सुरवात होऊन निर्माण होणाऱ्या वीररसाचें हास्यांत रूपांतर होतें.

" नणंदा भावजया खेळत होत्या ।
भावजयीवर डाव लागला ।
गोठ्यांत जाऊन रुसून बसली ।
सासूरवाशी ! सून रुसूनं बसली कैशी ।
यादवराया ! राणी रुसून बसली कैशी " ॥ ध्रु० ॥

या गाण्यांतही वरच्याच प्रकरणाची पुनरावृत्ति आहे. सर्वांनीं केलेली समजूत पुरी पडली नाहीं तेव्हां शेवटीं नवरा समजूत घालण्यास, अगर समज देण्यास म्हणावें हवें तर, जातो. त्याबरोबर दरवेळीं प्रत्येकाला,

" तुमचा संसार नक्को माला ।
मी नाहीं यायची तुमच्या घराला ॥ "

असें सांगणें बंद होऊन, एकदम

" उठलि ग बाई घाबरून ।
पदर घेतला आवरून ।
ओचा घेतला सावरून ।
पतिशीं बोले अदबीनं । "

अशी स्थिति झाली; व पतीनें सांगितलें,

" उठ राणी चल घराला ।
लाल चाबुक देतों तुला । "

त्याबरोबर " लाल चाबुक नक्को मला ।
मी येतें तुमच्या घराला ॥ " अशी समजूत पटते.

अल्पवयी माहेरवाशिणी; तेव्हां सासरीं आलेल्या भावजयीला बोलणें, तिची चेष्टा करणें, उणेंदुरें काढणें, हा त्यांचा हक्कच. " तुझ्या ग माहेरच्यांनीं काय काय दिलं " या गाण्यांत हें वर्णन सांपडतें :

" तुझ्या ग माहेरच्यांनीं काय काय दिलं ।
माझ्या ग माहेरच्यांनीं दिल्या मला पाटल्या ।
अशा कशा पाटल्या बाई होताला दाटल्या । " इ.

सासुरवाशीणहि कांहीं कमी नसते. सासरीं बोलतां येत नाहीं याचा वचपा माहेरीं आल्याबरोबर काढते. सासरचा गबाळेपणा, चिक्कूपणा,

" आतां माझ्या सासरचा वैद्य आणा, बाई वैद्य आणा "  इ. गाण्यांत नमुनेदारपणें तिनें वर्णन करून सांगितला आहे.

सासरीं मुलीच्या हातून थोडेंसें तेल सांडलें. सासू वाजवीपेक्षां जास्त बोलली. या प्रसंगाचें अतिशयोक्तिपूर्ण वर्णन मुलगी माहेरीं करते आहे:—

" पायांत पैंजण नाचूं कशी ? ।
गळ्यांत हार वाकूं कशी ? ।
बाहेर मामंजी बोलूं कशी ? ।
दमडीचं तेल आणूं कशी ? ।
दमडीचं तेल आणलं ।
सासूबाईचं न्हाणं झालं ।
मामंजींची दाढी झाली ।
भाओजींची शेंडी झाली ।
वन्सबाईंची वेणी झाली ।
उरलेलं तेल झांकून ठेवलं ।
लांडोरीचा पाय लागला ।
वेशी बाहेर ओघळ गेला ।
उंट आला वाहून गेला ।
हत्ती आला पोहून गेला ॥ "

इ. अतिशयोक्त वर्णनानें ती अद्‌भुतता निर्माण करते. पण शेवटीं

" सासुबाई ! सासुबाई ! अन्याय झाला ।
चार चाबुक जास्ती मारा ।
पण दुधभात खायला घाला " ॥  असें म्हणते.

या सर्व वर्णनानें हास्यरसच निर्माण होतो. कारण सर्वांचा सारांश एकच व तो म्हणजे,

" अस्सं सासर द्वाड बाई कोंडुनी मारीतं ।
अस्सं माहेर गोड बाई खेळाया मिळतं ॥ "

शृंगाररसांत उत्तानपणा नसला तरी उत्कटता असते. उदाहरणार्थ:

" गांवाला गेले बाई! नाहीं अजून कां आले?
कोमावले फुलझेले!
गांवाला गेले बाई! नाहीं पुसून ते मला
हार खुंटीचा सुकला!
गांवाला गेले बाई! याद घडी घडी त्यांची
रोज गोड बोलण्याची!
गांवाला गेले बाई! जाळी गुंफिली पलंगा
येतील ते कधीं सांगा?
गांवाला गेले बाई! नाहीं डोळ्याला डोळा
जीव झाला सवा तोळा!

* * *

" गांवाला गेले बाई! पाला पडला अंगणीं
वाळे हिरवी निंबोणी!
गांवाला गेले बाई! घांस तोंडतांला फिरे
मनं मोरावाणी झुरे!
गांवाला गेले बाई! सुटलां हा वारा धुंद
कोण्या वनांत *गोविंद?"

अशाच प्रकारचा हा दुसरा नमुना :—

" नार संपत्तीची मोठी, चाले वहिनी तोऱ्यानें,
भरजरीचा पदर, वर उडतो वाऱ्यानें!
नाकाच्या नथनीचा, आखुड झाला दांडा
नथ शोभली वहिनी! तुमच्या गोऱ्या तोंडा!
गोड बोलका भाऊजी, माही वहिनी प्रीतीची
कशी राघोला दंडते, मैना राघोच्या तोलाची!

* पति.

वर करोनी नजर, पाहतां कां रागूं रागूं
गांवाला गेले दादा, वहिनी ! किती सागूं ?

*    *    *

जाई मोगऱ्याच्या कळ्या, लालभरजरी शेल्या
सांगा वहिनी ! तुम्हांला, गुंफतां ह्या कशा आल्या ?
तंग दंडावर चोळी, लेते वहिनी बुट्यांची
लाल चमक बिजली, राणी माझ्यां केवड्याची !
कोळं लंबी लंबी बाल, लावतां हें किती तेल ?
वेणी गुंतली वहिनी ! सांगा कोण उकलंल ?
डुले हौसीच्या कानांत, सोनियाचें कर्णफूल
डोल डोलते कसे हे, बुगडीच्या खालीं झूल !
छत आरसे बिलोरी, महाल लाल रंग !
शेज फुलांची जाईच्या ! आंत छपरपलंग !
जळे पितळी कंदील, झगझगे लाल वात ।
वाट कोणाची पाहतां, काय वहिनी ! मनांत ? ”

शृंगाररस वणन करतांना फार करून ‘ वहिनी ’ व ‘ दादा ’ हीं नायक-नायिका कल्पिलेलीं असतात.

आतां स्त्रीनें स्वतःच पतीबद्दलची भावना ज्यांत व्यक्त केली आहे असें हें पुढील उदाहरण पहा :—

“ सख्यां भ्रताराचं सुख, सांगतांना देवद्वारीं
पांची पांडवांची सभा, बसवीन मी सामोरी
मारे हांक सखा रोज, पाणी पिण्याच्या मिषानं
म्हणे गोडी गुलाबीनं, “ मोहना ! पाणी आण. ”
सख्या भ्रतारांचं सुख, सांगूं कोणापाशीं रामा
येना लाडक्याच्या मामा, सुख सांगीन विसामा !
येतां बाहेरून पुसे, “ मनमोहना ना दिसे ! ”
कशी बोलूं एकाएकीं, घरीं वडील माणसें !

पाय टाकतां दारांत, म्हणे " विड्याचा खोळंबा !
कुठं पळाली वालंबा, प्रीतीची माझी रंभा ?"
म्हणे " आल्या गाई, घरीं, मालन कुठं गेली ?"
चतुर सासु बोले, " तेल नंदादीपा घाली !"
रोज कांकणाचा हात, भ्रताराच्या उशाखालीं !
लागते प्रीतीची झोंप, सख्याच्या रंगमहालीं !
राज्य भ्रताराचं सुखी, केलं कसं साधं भोळं
रोज जरीचं पातळ, नेसली मी पायघोळ !
गोड भ्रताराचं सुख, राती सांगतां अंगणीं
हांसे नाजुक चांदणी, तारा तुटला गगनीं !
गोड भ्रताराचं सुख, सांगतांना येतां जातां
भर दिवसा डोलला, वर सूर्या पाणी पितां."

अपौरुषेय वाङ्मयांतील करुणरसाचा मोठा आधार म्हणजे सुनेचा सासुरवास. पुढील उदाहरणांतील वर्णनानें कारुण्य निर्मित होते.

बहीण सासुरवाशी आहे. भाऊ न्यावयास येतो. पण बहिणीचा सासुरवास ऐकून तसाच उपाशीं परत जातो. यामुळें बहिणीच्या मनांत झालेली तळमळ पुढील ओंव्यांत व्यक्त झाली आहे:—

### उपाशीं गेले दादा !

" भाऊ बहिणीच्या दारीं, भर उन्हाचा कहर
दोन पहार दुपार !
भाऊ बहिणीच्या घरीं, गेला कोण्या समयानं
केली गर्दी उन्हाळयानं
भाऊ बहिणीच्या दारीं, उभा राहिला अंगणीं
नाहीं गंगाळांत पाणी !
टाकतांच पाय दारीं, सासुरवास ये कानीं
झालें काळजाचें पाणी !

आल्या पाउलीं कलोना, उभा गल्लीवर राहे
बहीण आंतुनी पाहे !
बहिणीचा सासुरवास, नाहीं कानीं ऐकवला
जीन घोड्यावर केला
' मरो बहीण ' म्हणोनी, घोडा फिरवला रानीं
नाहीं पाहिलें फिरोनी !
सेवया वेटोळ्यांनीं, उतरंड्या आगाशी,
भाऊ निघाला उपाशीं !
घरीं वासाचे तांदूळ, काय करतां असून
सासुरवासी बहीण ।
घराच्या वळचणींत, उभी राहिली बहिण
म्हणे, दादा जा भेटून ॥

* * *

आंब्याच्या सांवलींत, कोंयाळ बोले राधा
" उपाशीं गेले दादा "

' वात्सल्य ' हा स्त्री-गीतांचा आधार आहे तो वगळून रसाविष्कार पुरा करणें शक्य नाहीं. पुढील ओव्यांतील आविष्कार हृद्य आहे :—

" तान्ह्या रे तान्हीका, बाळा रे माणीका
तुझ्या रे श्रीमुखा निंबलोण
दृष्ट मी काढूं किती, मीठ मोहऱ्या काळी माती
गोरेपणा जपूं किती, तान्हे बाळाच्या.

माझें तान्हें बाळ, देवाचें मंगल
अमृताचें फळ, संसाराचें !
गरीब माउली, कोठलें बाळलेणें
बाळाला वात्सल्यानें, वाढवील.

आसवांची माळा, गळा घालील बाळाचे
गरीब माउलीचें, हेंची धन.

सखीया लेणें लेती, आपले हारदोरे
आपण दाखवूं, आपलें बाळ गोरें.
बाळा रे बागड, शिवीन आंगडं
बिदीये उघडं, जाऊं नये.
गायीच्या गोठ्यांत, सर्पाची वेटोळी.
तेथें तुझी चेंडुफळी, तान्हे बाळा
आणते चेंडुफळी, सर्पाच्या जवळून
सर्प भुले सर्पपण, मातेसाठीं.

भक्तिरसात्मक ओव्यांत राम, सीतामाई, कृष्ण, रुक्मिणी, यशोदा यांचीं पौराणिक कथानकें येतात. विठ्ठलरखुमाई यांचींही भाविकपणें केलेलीं वर्णनें येतात. 'गणपति' तर सिद्धिविनायक तेव्हां कोणत्याही कार्यारंभीं ओवींत त्याचें भक्तिभावानें आवाहन असतेंच.

पंढरपूरला जाणारी वारकरीण भक्तिभावानें वर्णन करते :—

"पंढरीला जातां, पहा महादेव उभा
वर देऊळाची शोभा !
पंढरीला जातां, वाट मला गवसेना
साधु मिळे संगतीला !
पंढरीला जातां, मोकळे सोडले केश
घडली एकादस
पंढरीला जातां, मोकळी माही वेणी
घडले तीर्थ दोनी
पंढरीला जातां, पंढरी किती दूर ?
वाजे वीणा बिनीवर
पंढरीला जातां, पंढरी बहु लांब
देवाच्या देउळाला, सोन्याचे गरुड खांब."

परंतु भक्तिरसासाठीं देवचरित्रें वर्णन करतांनाही संसारी जीवनाच्या छटा विसरल्या जात नाहींत.

जनाईच्या भक्तिचें वर्णन होतां होतां रुक्मिणीच्या सवतीमत्सराची छटा विनोद म्हणून का होईना वर्णन करावीशी वाटतेच.

" बोले रुक्मिणी रागांत, ' विठ्ठला ! कां नाहीं लाज !
सांगा जनीच्या वाड्याला, कशाला हो जातां रोज ? "
बोल विठोबा बोलला, ' नको गडे ! असें बोलूं
जनी अपंग बिचारी, होय आपलें लेंकरूं
जनाईचे मायबाप, देव विठोबा रुक्मिणी !
तुळशी ब्रिंदावनीं, वेणी घालती हातांनीं ! "

याखेरीज नमुन्यादाखल शृंगार, करुण, इ. रस ज्यांत सामावले आहेत असें एक लहानसें प्रकरण सांगून मग या वाङ्मयाच्या कांहीं वैशिष्ट्यांकडे वळणें बरें.

## मैत्रिणींचें हितगुज

" मिळाल्या, भेटल्या, गुजाच्या गुजकरणी ।
लहानपणींच्या मैत्रिणी, ताईमाई ॥

आपण बोलूं गुज, कशाला हवा दिवा ।
आहे चांदण्याची हवा, उषाताई ॥

तिन्ही सांजा झाल्या, दिव्यांतील वात डोले ।
सखी माझी गोष्ट बोले, हृदयांतील ॥

किती ग वरसांनीं, भेटलों दोघी जणी ।
सांठले किती मनीं, बोलूं आतां " ॥

पहिली मैत्रीण :—शत ग जन्मांची, पुण्याई आली फळा ।
माझ्या कुंकवाची कळा, सूर्यासारी ॥
लाखांत एखादा, तसा माझा पती ।
अनुरक्त परी व्रती भाग्य माझें ॥
पुरवीती हौस, मैत्रीणी विचारून ।
आम्ही ग नांदतों, दोघे हंसून खेळून ॥

काय विचारीशी, ' कधीं ना सखी तंटा ? ' ।
जीवेंभावें ओवाळीन, प्रेमरंगा माझ्या कंथा ॥
काय विचारीशी, आहे हो खरी सुखी ।
तुझ्या गळ्याची शप्पथ, कसें खोटें बोलूं सखी ॥

दुसरी मैत्रीण आपल्या प्रेमळ पण तापट नवऱ्याचें वर्णन करते :—

काय तूं पुसशीं, पळसा तीन पानें ।
संसारीं समाधानें, नांदूं सखी ॥
काय विचारीशी, ' होते का धूसफूस ? ' ।
मैत्रिणी येते घूस, घरा कधीं ॥
कधीं रागावती, बोलती कधीं गोड ।
मैत्रिणी अशी खोड़, कंथा माझ्या ॥
कधीं फुले ग वसंत, तुझी सखी तेंव्हां खुले ।
कधीं वैशाख वणवा, सखी तुझी होरपळे ॥
आधणाचें पाणी, त्यांत भात शिजवीतें ।
रुसवे फुगवे, त्यांत सुख पिकवीतें ॥
आधणाचें पाणी, ओतितें विसावण ।
पतीच्या रागांत, मिसळतें प्रेमगुण ॥
दूध वर येतां, पाणियानें खालीं जाई ।
कंथाचा ग राग माझ्या, हंसण्यानें नष्ट होई ॥
कंथ रागावतां सखी, हंसून बघतें ।
क्रोधी मुद्रा मोहावते, क्षणामाजी ॥

तिसरी सखी आपल्या दुर्दैवाचें वर्णन करते :—

रूप ना लावण्य, एक नाहीं गुण अंगीं ।
संसार त्याच्या संगीं, करणें दैवीं ॥
रूप ना लावण्य, सोडीना कधीं माडी ।
करितो नासाडी, जीवनाची ॥

रात्र ना दिवस, चंदनवेलीला ।
विळखा देऊन राहिला, नाग जेवीं ॥
समुद्राच्या कांठीं सखी, मोतीं पोंवळ्याच्या वेली ।
दैवाची उणीव, कडू वेल हातीं आली ॥
जीवाला जीव देत्यें, जीव देऊन पाहिला ।
पाण्यांत पाषाण, अंतीं कोरडा राहिला ॥
फोडिलं चंदन, त्याच्या केल्या बारा फोडी ।
स्त्रियांची जात वेडी, पुरुषांना माया थोडी ॥
सेवेला करितें, झटून झिजून ।
चीज त्याचें करी कोण, मैत्रिणी गे ॥
हंसेना बोलेना, कोणी सासरीं ग मशीं ।
मैत्रिणी जीवाशीं, कंटाळल्यें ॥
गळा घालूं गळा, ये ग रडूं पोटभरी ।
पुन्हा जायाचें सासरीं, चारा दिशीं ॥

पहिली मैत्रीण सांत्वन करते :—

"नको ग रडूं गडे, होईल सारें भलें ।
अवसेचें काळें, कोठें राहे ॥
नको रडूं गडे, होईल तुला सुख ।
प्रार्थीन गजमुख, तुजसाठीं ॥
नको रडूं गडे, होईल सारें भलें ।
चिखलीं कमळें फुलतात ॥
नको रडूं गडे, जरी वरून पाषाण ।
झिरपे आंतून, फुटतील ॥
मैत्रिणी भेटती, हांसती रडती ।
फिरून दूर जाती, संसारांत ॥
मैत्रिणी भेटती, जीवींचें बोलती ।
फिरून दूर जाती, संसारांत" ॥

# वैशिष्ट्य : : ११

साहित्यशास्त्रकारांनीं मानलेल्या रसांपैकीं शृंगार, करुण, हास्य, अद्भुत, वत्सल व भक्ति हे रस यांत आहेत. परंतु नुसतें येवढें म्हणून या श्रुति वाङ्मयाचें बरोबर वर्णन होणार नाहीं. भाऊ व बहीण यांचें परस्पर प्रेम, आईबाप व मुलगी यांचें परस्पर प्रेम, यांचीं इतकीं रसाळ वर्णनें येथें आहेत कीं, तीं वरील रसांत सामावत नाहींत; व पूर्वी कोणीं म्हटलें नाहीं, म्हणून येथें त्यांचेकडे डोळेझांक करणें व त्यांना रसप्रपंचांत स्थान न देणें योग्य नव्हे. शृंगार, वात्सल्य, इत्यादि विशिष्ट व्यक्तिगत प्रेमाचें वर्णन करणाऱ्या नांवांपेक्षां स्नेह या नांवानें त्या सर्व उत्कट जिव्हाळयांचें वर्णन करणें– या वाङ्मयापुरतें तरी–योग्य होईल.

स्नेह ( कौटुंबिक जिव्हाळा )

मायलेकी | भाऊबहीण | पतिपत्नी | मायलेकरूं | देव व भक्त

पोवाड्यांत जसा वीररस, लावणींत जसा शृंगार, तसा या श्रुतिवाङ्मयांत हा " कौटुंबिक जिव्हाळा " होय.

सर्व वाङ्मय स्त्रीच्या दृष्टिकोनांतून निर्माण झालेलें, त्यामुळें तिला येणाऱ्या अनुभवांभोंवतींच सर्व वाङ्मयनिर्मिति जणुं रंगण धरीत आहे. बालविवाहाच्या चालीमुळें मुलगी फार लहानपणीं सासरीं जाई. 'कधीं करिती लग्न माझें' असें मनांत येण्यापूर्वींच लग्न होऊन जाई. त्यामुळें तिला विरहाचा पहिला चटका बसतो तो आईबाप व भावंडें यांचेपासून दुरावण्याचा. बरोबरचा खेळगडी भाऊ परका होतो. भूक लागेल हें ओळखून त्यापूर्वींच खाऊ घालणारी आई, खेळ देऊन कौतुक करणारा बाप, दुरावतात. नवऱ्याची ओळखच नसते, मग त्याचेबद्दल जिव्हाळा उत्पन्न होणें व नव्या कुटुंबांतील तो आपला आधार आहे असें वाटणें दूरच असतें. "अमक्याच्या जिवासाठीं आईबाप सोडले.* असा उखाणा ती घेते तो केवळ वडील माणसें शिकवितात म्हणून! प्रियकराचा सहवासच घडलेला नसतो. तेथें विरह कुठचा ? पहिला विरह जाणवतो तो माहेरचा. म्हणून दुःखाच्या पहिल्या धक्यानें बाहेर पडणाऱ्या ओव्या इतक्या कळवळून येऊन स्वतंत्र रसपदवीस पोंचतात.

'मुलगी उपवर होणें', 'तिचा विवाह ठरवून त्याची तयारी करणें', 'मुलीची सासरीं पाठवणी' व 'माहेरीं येण्याची ओढ' हे सर्वच प्रसंग या वाङ्मयांत जिव्हाळ्याचे व म्हणून काव्यविषय झालेले आहेत.

उदाहरणार्थ—उपवर मुलीचें वर्णन :—

नवरी पाहूं आले, बसूं घालावं अंगणीं
नवरी शुक्राची चांदणी, उषाबाई

विवाह-समारंभाची तयारी :—

शीव शिंप्या चोळी, मोतीं लाव पसापसा
चोळी जाते दूरदेशा, उषाताईला

---

* चंदनाच्या देव्हाऱ्याला हिरेमोतीं जोडले। 'रामचंद्रपंतांचे' जिवासाठीं आईबाप सोडले ॥

शीव शिंप्या चोळी, मोतीं लाव परातींत
चोळी जाते वरातींत, उषाताईच्या

मुलीची सासरची पाठवणी अशीच कारुण्य निर्माण करते. 'मैना', 'मालन', हीं नांवें माहेरवासिणींचीं विशेष कौतुकनिदर्शक म्हणून येतात.

सांसऱ्याला जातां ! :—

" सासऱ्याला जातां, हात गळयांत घालते ।
खांब गाडीचा धरते, मैना लाडाची रडते ॥
सासऱ्याला जातां, गणगोताची मालन ! ।
भेटी भलाईनं सारा, गेला दिवस कलून ! ॥
सासऱ्याला जातां, नको रडूं फुसूफुसूं ? ।
सुजले रडून डोळे, किती शालीनं मी पुसूं ? ॥
सासऱ्याला जातां, सदा येते न माहेरा ।
घाला न्हाऊं लाडकीला, ताट लाडवाचें करा ! ॥
सासऱ्याला जातां, सासुरवास फेडा ।
साळीच्या भातावर, बत्तासे गोड फोडा ॥
सासऱ्याला जातां, रडतं कां सांग तरी ? ।
पाठीचा बंधु राजा, देतो तुला धूर करी ॥
सासऱ्याला जातां, मोठी ठकाऱ्याची तानी ! ।
आसुं पुसा नेतराचीं, सोडा लुगड्याची चिणी ।
सासऱ्याला जातां, लागेल तोंडाला ऊन
हाणा गाडी सावलीनं, केळीच्या बनांतून ॥
सासऱ्याला जातां, मैना मुळूमुळू रडे ।
पहा बाई तोंडाकडे, धकली गाडी पुढें ॥ "

अर्थात् या सर्व माहेरच्या ताटातुटीच्या वर्णनांत प्रेमविवाहांत दिसून येणारी पुढच्या घराची ओढ दिसत नसते.

या वाङ्मयांतील 'मैना', 'मालन' शकुंतलेप्रमाणें

आर्यपुत्रदर्शनोत्सुकाया अपि आश्रमपदं परित्यजन्त्या मे चरणौ
दुःखेन पुरतः प्रवर्तेते ।

असें म्हणूं शकत नाहीं अगर 'To Marry or not to Marry!' या कवितेंतील नायिकेप्रमाणें

"But when in Harry's eyes I see"
"All the world of love, there burning."

असें म्हणून स्वतःच्या प्रियकराच्या डोळ्यांतील प्रेमाची साक्ष देऊं शकत नाहीं.* आणि म्हणून ही ताटातूट जास्तच हृदयद्रावक होते.

माहेरीं येण्याची ओढ कशी वाटते याचें उदाहरण म्हणून 'माहेरा जाते बाई' हें सर्वच प्रकरण 'वऱ्हाडी लोकगीतां'तून वाचण्यालायक आहे. वरमाईचें कौतुक हाही या वाङ्मयाचा एक विशेष आहे. दुर्दैवानें सासर खाष्ट निघालें तर आई, बाप व मुलगी सर्व दुःखी होतात आणि नातू होऊन पुढें सुख लागेल या एकाच आशेवर जीव धरून राहतात. त्या आशेचें वर्णन असें येतें.

बाप बोले बाई लेकी, नांदून तूं नांव कर।
केळीच्या शुद्ध पोटीं, कंबळ निपजलं ॥
आलों न्यावयाला तुला, नाहीं बोलत जांवई!।
जागीं राहिला विचार, कशी नेऊं तुला बाई!॥
म्हणे बाप पोरी! कशी, तानपणीं मेली नाहीं।
तुझ्या संसाराची पोथी, ऐकवली नाहीं कांहीं!॥

---

* To Marry or not to Marry!
"But when in Harry's eyes I see"
"All the world of love there burning"
"On my six advicers turning"
"I make answer—but Harry"
"Is not like all men, who Marry!"
"Fate has offered me a prize"
"Life with love means paradise"
"So in spite of all they say"
"I shall name the wedding day."

दिली घरीं मोठ्या लेक, नाहीं हात म्यां धुतले ! ।
हळदी-कुंकवानें, नाहीं रंगले बंगले ! ॥

* * *

" आज सासुरवाशीण, घरीं जात्याचं झाडणं ।
पोटच्या बालकानं, पुढं फिटलं पारणं ! ॥ "

मुलगा झाल्यास त्याच्यामुळें तरी बरे दिवस येण्याची आशा; कारण—
" देवाचा देवपाट ! फुलानं शोभिवंत
नार पुत्रानं भाग्यवंत ! "

पण सासर चांगलें असल्यास कालक्रमानें नवऱ्याचा सहवास मिळून त्याचेबद्दल जिव्हाळा उत्पन्न होतो.

मागून अपत्यप्रेमाचा अनुभव येतो व ती स्वतःच्या संसारांत रंगून जाते. तरी पण माहेरचा हक्काचा आपलेपणा मनांत असतोच. भाऊ सत्तेचा वाटतो. भावालाहि तसेंच वाटतें. पण भावजय येऊन तो स्वतःच्या संसारांत गुंतूं लागला म्हणजे आपलेपासून कांहीं तरी दुरावत असल्याची जाणीव तिला येते. भावाच्या सुखाचा विचार करून ती भावजयीशीं प्रेमानें वागण्याचा प्रयत्न करते. पण भावना अशी कीं—

भावा ग परीस, भावजय ग रतन ।
सोन्याच्या कारणें, चिंधी करावी जतन ॥

भाऊ स्वतःच्या मुलींत बहिणीला थोडा विसरला तर तिला वाटतें—

वळवाचा पाऊस, पडून ओसरला ।
भावाला झाल्या लेकी, मग बहिण विसरला ॥

सासरीं समाधान असलें तरी एक दिवस तरी माहेरपण मिळण्याची आशा उरते :—

बहिणीला भाऊ, एक तरी तो असावा ।
पावल्याचा खण, एका रात्रीचा विसांवा ॥

भ्रताराच्या राज्यांत सारें मिळालें तरी माहेरचें घराणें चालू रहावें, एक तरी भाऊ असावा असें वाटतें; नाहीं तर दुःख वाटतें :—

भ्रताराच्या राज्यीं, सारं मिळालं आटीचं।
नाहीं देवा दिलं, सख्खं भावंड पाठीचं ॥

पुढें तिच्याच मुली मोठ्या होऊन त्यांच्या विरहाचा अनुभव येतो, मातृहृदय कळवळतें व त्यांचें माहेरपण करण्याच्या काळजींत तिचें स्वतःचें माहेर मागें पडतें. मुलाबद्दल वात्सल्य, कौतुक, अभिमान सर्व असलें तरी हा विरहाचा अनुभव येत नाहीं. विरहाच्या अनुभवानें मायलेकींचा परस्पर जिव्हाळा काव्यांत आर्ततेनें ओतला जातो. जर पूर्वीच्या रूढ पद्धतीप्रमाणें भावाची मुलगी तिचे मुलास दिली गेली तर त्या निमित्तानें तिच्या माहेरचा संबंध जास्तच जवळ येतो. जसें—

चला आत्याबाई, माहेराला जाऊं।
न्यायला आला, माझा बाप तुमचा भाऊ ॥

माय-लेकी व बहीण-भाऊ यांना परस्पर वाटणाऱ्या जिव्हाळ्याचे नमुने म्हणून एकदोन उदाहरणें पुढें दिलीं आहेत :—

### मुलीचें आईबद्दल प्रेम

जेवण जेविलें खिरीवरी केळं, माझ्या बयाचं राज्य भोळं।
केळं साखरेचं आळं, आंत तूप डळमळं ॥
माझ्या आईनं न्हाणीलं, कसं केसोकेसीं लोणी।
सारी उकलली वेणी, गेला वास द्वारकोणीं ॥
उभ्या चिंचीची सावली, चिंचीच्या ते बरोबर।
काय माउलीची सर, करील ते सावतर ॥
बाई चिंचीची सांउली, राहे चिंचीच्या पुरती।
सग्या माउलीची सर, कशी करील चुलती ॥
गणगोतांनीं भरून, मायेविना सारा गांव।
कंठ पाण्यानं सुकतां, घेते विहिरीची धांव ॥
जन्मली मी तुझ्या पोटीं, कशी म्हणूं तूं ओंगळ।
गंगे परीस निर्मळ, तूं ग केळी मी कंबळ ॥

## आईचें मुलीबद्दल प्रेम

पुढील आर्व्यांत आईला मुलीबद्दल वाटणारा ओढा स्पष्टपणें दिसतो :—

" रुसले जांवई, बाई! आपल्या मानाले ! ।
करा मानपान सारे, आणा दिवाळी सणाले ॥

सेवयाचा घास, गोड जावयाच्या तोंडीं ।
बाई एवढा आग्रह, लेकी मालिनीच्यासाठीं ! ॥

रोज आयुष्य चिंतलें, लेकी आधीं जावयाला ।
माझ्या लाडाच्यां मैनाला, बाई ! रोज भोगायाला ! ॥

लेकीचे जीवासाठीं, सारी जांवयाची गोडी ! ।
लेक जीवाच्या आंतली, गोड साखरेची पुडी ॥ "

तसेंच

" लाडक्या लेकीला, आंदण आमराई
मागें सोन्याची समई !

लाडक्या लेकीला गोड लाडवाचं खाजं
झालं गाडीवर ओझं !

लाडकी माझी लेक, चुलत्याची ' बाई बेटा '
भरला खाज्यांनीं ओटा !

लाडकी माझी लेक, नका नेऊं बाई गांवा
उन्हाच्या लागे झांवा !

* * *

लाडक्या लेकीला, रोज भातक्याचा लावा
घरीं हलवाई ठेवा !

लाडकी माझी मैना, उपाशीं लागे निजूं
बत्तासे टाका भिजूं !

लाडकी माझी मैना, निजे उपाशीं घरांत
भिजे साखरतुपांत !

लाडकी माझी मैना, धकत नाहीं भात
आणा मिठाई ताटांत !

शेरभर सोनं, गुंजीभर उणं
करा मैनाला टोपण !

लाडाची लाडकी, जाते सासऱ्या चांगुणा
चिमून झाली चुना !

राहे इकडे तिकडे, माहे दोन्हीकडे नेत्र
बोले मैना " धाडा पत्र " !

आई आजारी पडली तर शेवटच्या भेटीस मुलीला बोलावतांनासुद्धां मुलीला दुःख होऊं नये अशी काळजी ती निरोप सांगतांना घेईल—

" माझ्या जीवाला जडभारी, नका सांगूं एकांएकीं
व्याकूळ होईल ती, यमूबाई !
माझ्या जीवाला जडभारी, नका सांगूं हरिणीला
पडेल धरणीला, यमूबाई ! "

## बहिणीचें भावांवरील प्रेम

बहिण-भावंडाची, जोडी बसली वावरी ।
राघू मारीत भरारी, मैना झालीया बावरी ॥

बहिण-भावंडाचा, झगडा रानीं-वनीं ।
बहिणीच्या डोळां पाणी, भाऊ चिंतावला मनीं ॥

सुपभर सोनं, नार लेतिया कवाबवा ।
माझा बंधुराया, चंद्रहार केला नवा ॥

शेजीच्या बंधवाला, दादा म्हणायची चोरी ।
मांडीला देते मांडी, सख्या बंधुची गोष्ट न्यारी ॥

लोकाच्या लग्नांत, नाहीं कुंकवाचं बोट ।
बंधुच्या लग्नांत, घोळ पातळाची अट ॥
आम्ही तिघी बहिणी, जशा वनींच्या बारवा ।
माझ्या बंधुराया, माझा सुकेशा गेला गांवा ॥
सोयऱ्याचं बोल, कडुलिंबयाची वाटी ।
माझ्या बंधुराया, घोटावं बहिणीसाठीं ॥
एकुलता एक, नको म्हणूं शेजी नारी ।
माझा बंधुराया, मला हजाराला भारी ॥
माझ्या गळ्यावर सुरी, जीव माझा जाऊं राहूं ।
माझ्या बंधवाची आण, कशासाठीं वाहूं ॥

एकंदरींत स्त्रीजीवनांतील काव्यस्फूर्तीचा झरा बालविवाहामुळें होणाऱ्या माहेराच्या ताटातुटींतून प्रथम बाहेर पडतो व म्हणून आई, भाऊ, इत्यादि माहेरच्या माणसांबद्दलची ओवी इतकी कळवळून बाहेर पडते. पितृसत्ताक कुटुंबपद्धति व तदंतर्गत निर्माण झालेली बालविवाहाची रूढि यांचेकडून मराठी वाङ्मयाला मिळालेलें हें लेणें आहे.

# टीपा

पृष्ठ २, ओळ १६—‘ अपौरुषेय ’

( अ ) प्रि. नी. शं. नवरे यांनीं ता. २३-६-४६ रोजीं पनवेलहून लिहिलें—

“ मी परवां आपणांस सांगितल्याप्रमाणें पुढील उतारा पाठवीत आहें. पुस्तकाचें नांव—

संसारदर्पण—लेखक-भट्टविद्याभूषण तांबेशास्त्री, कोळथें, रत्नागिरी, आवृत्ति दुसरी, १९३३

प्रकरण चवथें, पृष्ठ २२—‘ धर्मसमजुती व म्हणी ’-“ म्हणी कोणीं तयार केल्या हें सांगतां येणार नाहीं; वेदाप्रमाणें म्हणीसुद्धां अपौरुषेय आहेत. वेदमंत्रांचा द्रष्टा ऋषि तरी असतो पण म्हणींना द्रष्टाहि नाहीं! अर्थात् ‘ जेथें अमुक कर्ता अगर अमुक द्रष्टा असें ठरवितां येत नाहीं, तेथें म्हणींना अपौरुषेय असें कां म्हणूं नये ? ’ आपण तीनचार वर्षांपूर्वीं पुण्यास स्त्रियांच्या ट्रेनिंग कॉलेजांत व्याख्यान देतांना ‘ अपौरुषेय ’ हा शब्द योजलेला मीं ऐकल्याचें स्मरतें. ‘ पुरुषांचें वाङ्मय नव्हे तें.’ असा आणखीहि श्लेष त्यांतून आपण काढला होता.” —क.

( ब ) दि. बहादूर कृष्णलाल माधवलाल जव्हेरी यांनीं काठेवाडामध्यें अशाच तऱ्हेच्या उपलब्ध असलेल्या वाङ्मयाचा उल्लेख [ Indigenous Literature-स्वदेशोद्भव वाङ्मय किंवा ] ‘ स्वयंभू वाङ्मय ’ असा केला आहे.

“ There is an indigenous ballad literature peculiar to Kathiawad......It has been preserved up till now, like the texts of Vedas in early days, not as a written record but by oral tradition. ......It has not been possible to discover the author of these ballads, nor indeed is it known whether the ballads were the work of many or of one. Only one thing is certain that these ballads are old and very popular.”

[ ‘ Milestones in Gujarati Literature ’, p. 253.]

पृष्ठ २, ओळ १८—‘ पुरुषकृत् ’ पाहिजे. ( जेथें जेथें पुस्तकांत पुरुषकृत आहे तेथें तेथें पुरुषकृत् हवें. )

पृष्ठ १०, ओळ १८—मुळांत उल्लेखिलेल्या ओव्यांखेरीज लेखगत होऊन टिकलेल्या ओव्यांचा नमुना पुढील होय :—

गौमतिये तिरी, निळीया गुंडुरा ।
राजेया गुजरा, श्रीचक्रधरा ॥
नीळा गुंढरूं, राजा गुजरू ।
मंडपीं मांडवी, श्रीचक्रधरू ॥
आंग गोरे बाइया, डवरिया चंदने ।
चक्रधरा झणें, दृष्टी होये ॥

( ‘ ऐतिहासिक विविध विषय ’वरून—खंड १ ला, पृष्ठ २०८. )

पृष्ठ २५, ओळ ६—कारल्याच्या भाजीप्रमाणेंच ‘ अंबाडीची भाजी ’ ही करायला अवघड व त्यावर सुनेचा सुग्रणपणा ठरतो. खेळांतील उखाण्यांत याबद्दल असे उल्लेख येतात :—

अंबाडीच्या भाजीला, तांदुळाची कणी ।
येईल घरचा धनी, त्याला सांगुं नका कुणी ॥
अंबाडीच्या भाजीला, पळी पळी तेल ।
पहा पहा सासुबाई ! सुनेचा खेळ ॥

पृष्ठ २७, ओळ १८—हें गाणें भा. इ. सं. मंडळाच्या इतिवृत्तांत ( शके १८३८–सन १९१६), वर्ष सातवें, यांत समाविष्ट केलेलें आहे. लेखाचें नांव ‘ जुनी महाराष्ट्रीय गीतें, हस्ता नं. ४ ’, पृष्ठ ८१, संकलन-कार—श्री. वा. दा. मुंडले.

गाणें मोठें उद्बोधक असून सर्वच्या सर्व वाचनीय आहे.

पृष्ठ ३८, ओळ १–पुढील गुजराती गीत ‘ रसियाना रास ’ या श्री. रायचुरा यांनीं प्रकाशित केलेल्या लोकगीतांच्या संग्रहांतील आहे. पृ. ४६.

“ **पांदडे !** ”

द्राक्ष मीठी रे पांदडे,
एवा मीठा मारा दादाजींना बोल रे ;
नावलियो मारो नेहे भर्यो रे ॥

कांकच कडवी रे पांदडे,
एवा कडवा मारा ससराजींना बोल रे;
नावलियो ......... भर्यो रे ॥
शेरडी मीठी रे पादडे,
एवा मीठा मारा माताजीना बोल रे;
नावलियो ......... भर्यो रे ॥
लिंबी कडवी रे पांदडे,
एवा कडवा मारा सासूजींना बोल रे;
नावलियो ......... भर्यो रे ॥
द्राक्षा मीठी रे पांदडे,
एवा मीठा मारा वीराजीना बोल रे;
नावलियो ......... भर्यो रे ॥
कांकच कडवी रे पांदडे,
एवा कडवा मारा जेठजींना बोल रे;
नावलियो ...... भर्यो रे ॥
केरी मीठी रे पांदडे,
एवा मीठा मारा भाभडलीना बोल रे;
नावलियो मारो नेहे भर्यो रे ॥
मरची तीखी रे पांदडे.
एवा तीखा मारा नणदडीना बोल रे;
नावलियो मारो नेहे भर्यो रे ॥

पांदडे = पानाला, नावलियो = नवरा, नेहे भर्यो = स्नेहभरीत, कांकच = सागरगोटा, शेरडी = ऊंस, लिंबी = कडुलिंब, वीर = भाऊ, जेठ = वडील दीर, केरी = आंबा, भाभडली = भावजय, मरची = मिरची.

द्राक्षिचं पानं मोठं गोड ग । गोड ग ।
तसा माझ्या पिताजींचा बोल ग ॥
तिकडची स्वारी सदा गोड ग ॥

अशा तऱ्हेचें. याचें भाषांतर होईल. गाणें फार सुबोध असल्यानें अर्थ सहज कळतो.

पृष्ठ ३१, ओळ १६—सूर्यनारायणाच्या कहाणीची पोथी राजवाडे यांना कऱ्हाडास एका भिक्षुकाच्या घरीं गळाठ्यांत सांपडली व त्यांनीं ती इतिहास संशोधक मंडळांत संग्रहाला ठेवली आहे.

पृष्ठ ४०, ओळ ५—'बाळबोलां' ची या उखाण्याच्या प्रकाराशीं तुलना करणें मनोरंजक आहे. लहान मुलाला खेळवितांना, जेऊं-न्हाऊं घालतांना, उपयोजिलेली शब्दरचना अशीच असते. लहान वर्षा-दोन वर्षांचें मूल. आई त्याचें कौतुक करते.

"लव लव साळुबाई मामा येतो
हातीं खोबऱ्याची वाटी देतो"

व मूल हात पुढें करतें.

"पाय जो मोडिला। पायावरनं गाडा गेला।
लंगड्यापायीं झगडा केला॥"

या शब्दरचनेनें मूल पाय पुढें करून हालवूं लागतें.

मुलगी लहान पण अशक्त असेल तर आई कौतुकानें म्हणते:—

"ही सोन्याची सखुबाई बरं का!
तिला बाजारांत नेऊं नका बरं का!
तिला पोरबाळं मारतील बरं का!
तिचे फुटाणे खातील बरं का!"

तसेंच, मुलीला उपदेश:—

"अग सखुबकु ग!
बाहेर जाऊं नको ग!
तुला पोरी मारतील!
फडका तुझा फाडतील!
तुला नाहीं बळ!
आणि चिमटा घेऊन पळ!"

पृष्ठ ४२, ओळ २०—अनुष्टुभ छंदः—अनुष्टुभ् ( संस्कृत शब्द). अनुष्टुप–ब–भ ( मराठी शब्द ).

पृष्ठ ४२, ओळ २३—" सामान्य गद्यापेक्षां प्रत्येक " ओळीच्या सुरवातीचे शब्द गाळावे.

पृष्ठ ४५, ओळ २२—ही ओळ अशी पाहिजेः—'उखाणा' हा अपौरुषेय वाङ्मयांतील ओवीचा आणि म्हणूनच मराठी वाङ्मयांतील पुढच्या परिणत स्वरूप– ओवी, अभंग, इ.– छंदरचनेचा पूर्वज होय.

पृष्ठ ४६, ओळ १५—कानडी उखाण्याचे नमुने—

( पाठविणार— सौ. कुसुम देशपांडे, जी. ए. )

( १ ) कर्णाटक साम्राज्यवन स्थापद्दिद्व विद्यारण्ये ।
××रायरु पति यागीद्दु पूर्वजल्मद पुण्ये ॥

( अर्थ—'विद्यारण्य कवीनें कर्नाटकचें राज्य स्थापलें ×× राव माझे पति पूर्वपुण्याईनें लाभले.' )

( २ ) पांडवरु अरगीन मनीदिंद पारादरु युक्तिदिंद ।
××रायर ह्यसर हेळतेनी भक्तिदिंद ॥

( अर्थ—'पांडव लाखेच्या घरांतून पार पडले युक्तीनें ×× रावांचें नांव सांगितलें भक्तीनें.' )

( ३ ) ध्रुवगे नारायणे भेट्ट आदरे वनदल्ले ।
××रायर ह्यसर हेळतेनी मनीअल्ले ॥

( अर्थ—'नारायण ध्रुवाला भेटले वनामध्यें ×× रावांचें नांव घेतें घरामध्यें.' )

पृष्ठ ५६ ओळ १३—ओव्यांप्रमाणें उखाण्यांतही 'घाट' असतात. 'चहा बाई चहा रानोमाळी चहा', 'समोरच्या कोनाड्यांत', 'आमच्या चुलीवर' हे त्या घाटांपैकीं विशेष उपयोजिले जाणारे घाट आहेत.

पृष्ठ ६९, ओळ १८—

गोविंद = नवरा

मैना<br>मालन } = नववधू, लाडकी सासरीं जाणारी मुलगी.

लक्षुमी = सून

काशी<br>
गंदारी ( गांधारी )<br>
गोदू ( गोदावरी नदी ) } = आई.<br>
बया

बाजी ( कर्तबगार ) = बाप.

हे या वाङ्मयांतील रूढ कविसंकेत आहेत.

( अ ) गुजराती भाषेंत अंतकडी हें नांव 'भंड्या' लावण्याच्या खेळास देतात. भोंडल्याच्या गाण्यांतील 'अंतकडी' म्हणजे पहिल्या चरणांतील शेवटला अगर मुख्य शब्द घेऊन तत्संबंधीं कल्पना दुसऱ्या चरणांत वाढवावयाची व दुसऱ्या चरणांतील शेवटला शब्द घेऊन त्याला धरून तिसऱ्या चरणाची रचना करावयाची. उदाहरणार्थ—

"पांच लिंबांचा पाणवठा । माळ घालीते **हणमंता** ॥<br>
**हणमंताची** नीळी घोडी । येतां जातां **कमळ** तोडी ॥<br>
**कमळा**पाठीमागं लागली **राणी** ॥<br>
अग अग **राणी** । इथं कुठं पाणी ।"

किंवा याला 'दामयमक' असें म्हणता येईल. दामयमकाचें पुढील उदाहरण मनोरंजक आहे. पुढील कलियुगाचें वर्णन; अर्थात् सुधारणा व शिक्षण यांमुळें झालेल्या अनाचाराचें वर्णन; हें मेळयाच्या पदांतील वर्णन आहे.

घालितां नये **रांगोळी** ।<br>
**रांगोळि** वाढिते मीठ खिरीच्या **खालीं** ।<br>
**खालील** बाजूची जळुनी गेली **पोळी** ।<br>
**पोळी** न ये परी वदे इंग्रजी **बोली** ।<br>
**बोलते** तिची संसारदक्षता गेली ।<br>
चा. ब. शिक्षण झालें फाजील, झालें वाटोळें ।<br>
चा. प. हा उलट कलीचा काळ, ओळखा मोहजाल सगळें ॥ १ ॥

# परिशिष्ट ( अ )

'सत्यकथे' च्या सप्टेंबर १९४५ च्या अंकांत प्रसिद्ध झालेला हा वानवळा थोडीफार भर घालून येथें दिला आहे.

## अपौरुषेय वाङ्मयाचा वानवळा

जानपद जीवनांत नागपंचमीच्या फेराच्या गाण्यांचें व उखाण्यांचें महत्त्व फार. नमुन्यादाखल एक फेराचें गाणें व कांहीं उखाणें पुढें दिले आहेत. फेराचें गाणें माझ्या स्वकीय संग्रहांतील असून एका माळणीकडून मिळालेलें आहे. उखाण्याच्या संग्राहक कु. अनसूयाबाई देवघर, बी. ए., बी. टी., या असून आपल्या संग्रहांपैकीं कांहींचा उपयोग त्यांनीं मला करूं दिला, याचा कृतज्ञतापूर्वक उल्लेख करावासा वाटतो.

## फेराचें गाणें

नागपंचमीचे सुमारास रानांत जाऊन वारुळाभोंवतीं अगर गांवांतच नागाची आकृति तयार करून त्याभोंवतीं स्त्रिया फेर धरून गाणीं म्हणतात. शहरापेक्षां स्वाभाविकच खेड्यांत ही पद्धति फार जोरांत कायम आहे. त्या वेळीं म्हटल्या जाणाऱ्या गाण्यांपैकीं एक येथें उद्धृत केलें आहे.

गाण्यांतील कथानक थोडक्यांत पुढीलप्रमाणें आहे—जइता नांवाची एक सासुरवाशीण वारुळाभोंवतीं फेर धरण्यास मैत्रिणी गोळा करते व रानांत जाते. सासूसासऱ्यांना हें तिचें कृत्य आवडत नाहीं म्हणून ते तिला घरांत घेत नाहींत. यामुळेंच वाईट वाटून जइता माहेरच्या गांवीं जाते पण नांव-गांव न सांगतां भावजयीबरोबर दासी म्हणून माहेरीं येते व कामकाज करूं लागते. दळतांना तिनें गायिलेल्या गाण्यावरून आई तिचा आवाज ओळखते व रडूं लागते. इतर कोणास ओळख पटत नाहीं. भावालाहि 'आपण दासी असलों तरी बहिणीप्रमाणें वागवा' अशी ती विनंति करते. तेव्हां भावाला बहिणीची आठवण येऊन तो तिला माहेरीं आणावयास गाडी घेऊन जातो.

जइताच्या सासूला 'तिला घालवून दिली' असें सांगणें जड वाटतें. शेवटीं एक कणकीचा पुतळा करून त्याला लुगडें नेसवून ती जइता म्हणून त्याचेबरोबर रवाना करतात. वाटेंत हें कपट भावाला कळतें. तो येऊन आईजवळ सुरी मागतो व म्हणतो, "माझ्या मेहुण्यानें माझी बहीण मारिली; तरी त्याला मी मारून टाकतों." या वेळीं मात्र जइता पुढें होऊन ओळख देते व विनंति करते कीं, ज्याच्या जिवावर मी हळद-कुंकूं लावतें त्याला मारूं नकोस.

पद्यदृष्टीनें उल्लेखनीय विशेष:—

(१) या पद्याची प्रत्येक ओळ दोनदां म्हणावयाची असते. त्यामुळें विषमसंख्य चरण असले तरी विषमता वाटत नाहीं. जसें—

आली वर्साची पंचमी।
आली वर्साची पंचमी॥

(२) पद्यांत येणारीं वर्णनें कथनासारखीं वाटतात. म्हणजे एखादी गोष्ट वर्णन करून ती जास्त सुंदर आहे असें दाखविण्यापेक्षां त्यांतील घटना एक, दोन, तीन अशा क्रमानें सांगितल्या जातात.

(३) एकदां एखाद्या व्यक्तीचें अगर प्रसंगाचें वर्णन केलें कीं पुन्हा जेथें जेथें त्याचा उल्लेख येतो, तेथें तेथें तें वर्णन पुनरावृत्त केलें जातें. जसें—

जइताच्या पोशाखाचें वर्णन—

"घातली काचबंदी चोळी
नेसली चक्राचा पाटाव
घातला सर्व शिनगार
घातला नवरत्नी हार"

प्रवासाचें वर्णन—

"वनमार्गी लागली
एक वन ओलांडिलं
दोन वनं ओलांडिलं
तीन वनं ओलांडिलं
चवथ्यापांचव्या वनाला"

कुठेंहि एका गांवाहून दुसऱ्या गांवीं जाण्याची गोष्ट आली कीं असें वनांचें वर्णन यावयाचें. हें अलिखित पण स्मृतिभूत वाङ्मय. त्यामुळें स्मरणांत राहण्यास या पुनरावृत्तीची फार मदत होते व म्हणून ही पुनरावृत्ति त्यांत इतक्या विपुलतेनें आढळत असावी.

### गाणें ' जइताचें '

आली वर्सांची पंचमी ।
जाती आवा जी खेळाया ।
पति जायाचं वंजला* ।
मणभर गहूं दळायचं ।
मणभर गऱ्हाचा एकच घाना ।
मणभर साळी सडायच्या ।
मणभर साळीचा एकच घाना ।
भरली लाह्याची दुरडी ।
घेतले नागाला पउत † ।
घेतले नागाला दूध ।
घेतल्या कुंकवाच्या वाट्या ।
घेतल्या हळदीच्या चिट्या ‡ ।
घातली काचबंदी § चोळी ।
नेसली चक्राचा ॥ पाटाव ।
घातला सर्व सिनगार ।
घातला नउ रतनी हार ।
गेली बामणाच्या आळी ।
" वाण्या-बामणाच्या मुली ।
वारुळाला येतां कुणी । ? "
जइता तेथुन निघाली ।

---

* प्रवासाला, फिरता व्यापार करायला. † पउत–कापसाचें वस्त्र किंवा तातू. ‡ चिट्या–चिमट्या. § काचबंदी – भिंग बसविलेली. ॥ चक्राचा पाटाव = पैठणी, महावस्त्र.

गेली साळ्याच्या आळी ।
" साळ्यामाळ्याच्या मुली ।
वारुळाला येतां कुणी । ?"
जइता तेथुन निघाली ।
गेली तांबोळ्याच्या आळी ।
" तेल्या तांबोळ्याच्या मुली ।
वारुळाला येतां कुणी ?"
जइता तेथुन निघाली ।
वारुळापाशीं आली ।
काढली लाह्याची दुरडी ।
काढल्या कुंकवाच्या वाट्या ।
काढल्या हळदीच्या चिट्या ।
वाह्यल्या नागाला लाह्या ।
वाह्यलं नागाला पउत ।
वाह्यलं नागाला दूध ।
एक फेरं जी फेरला ।
दोन फेर जी फेरले ।
तीन फेर जी फेरले ।
चौथ्या पांचव्या फेराला ।
नऊ रतनी हार तुटला ।
" वाण्याबामणाच्या मुली ।
माझ्या मैतरणी व्हा ग ।
माझा हार वेचून द्या ग ।
साळ्या-माळ्याच्या मुली ।
माझ्या मैत०...वेचुन द्या ग ।
तेली तांबोळ्याच्या मुली ।
माझ्या मैत०...वेचुन द्या ग ।"
जइता तेथुन निघाली ।
वाट मारगीं लागली ।

जइता घराशीं आली ।
गेली सासुच्या महालीं ।
" अव आवाजी आवाजी ।
उघडा खिडकी-कवाड । "
" आमची कवाड सायाची * ।
कुलप उघड ना लाह्याची ।
असली सून काय बाई काजु † ।
आपल्या माहेरीं करात्री राजु ‡ । "
जइता तेथुन निघाली ।
सासऱ्याच्या महालीं गेली ।
" अव मामंजी मामंजी ।
उघडा खिडकी-कवाड । "
" आमची कवाड ... करावी राजु । "
जइता तेथुन निघाली ।
आपल्या महालामध्यें आली ।
काढली काचबंदी चोळी ।
फेडला चक्राचा पाटाव ।
काढला सर्व सिनगार ।
काढला नउ रतनी हार ।
नेसली फाटकं तुटकं ।
धरली माहेराची वाट ।
वनमारगीं लागली ।
एक वन ओलांडिलं ।
दोन वन ओलांडिलं ।
तीन वन ओलांडिलं ।
चवथ्या-पांचव्या वनाला ।

---

* सायाची = सागाच्या लाकडाची. † काजु = काजाची, कामाची.
‡ राजु = रुजू.

आलं जइताचं माहेर ।
पानवंत्या* उतरली ।
भावजय पान्या आली ।
तिथं तिला बोलती झाली ।
" तूं तर कोणाची कोण ? "
" मी तर मुलखावरची दास । "
" खुशाल आमच्या घरीं आस । "
जइता घागर घेतली ।
जइता घराशी आली ।
जइता घागर उतरली ।
जइता दळण काढीलं ।
जइता दळाया बसली ।
" पहिली ग माझी ओवी
माता माझ्या चंदनाला † "
माता रडे खळखळां ।
" माझ्या जइताचा गळा "
भावजय बोलती झाली ।
" येड्या झाल्यास आवाज़ी ।
साता खणाची उपरमाडी ।
तेथें नांदे जइता लाडी ।
जइता येइल कशाला । "
" दुसरी ग माझी ओवी ।
पिता माझ्या मदनाला ‡ "
माता रडे खळखळां ।
" माझ्या जइताचा गळा । "

---

* पानवंत्या – पाणवठा. † चंदनाला = चंदनाप्रमाणें झिजणारी, कष्टाळू. ‡ मदन = समर्थ.

" भावजय बोलती... कशाला । "
" तिसरी ग माझी ओवी ।
भावा माझ्या ती रामाला । "
माता रडे खळखळां ।
" माझ्या जइताचा गळा । "
भावजय बोलती "...येईल कशाला । "
जइता दळण भरीलं ।
जइता स्वयपाक केला ।
बापा भोजन वाढीलं ।
आई भोजन वाढीलं ।
भावा भोजन वाढीलं ।
भावजय भोजन वाढीलं ।
घेतलं शिळंपाकं टुकडं ।
आपण भोजन केलं ।
बापा बिछाना केला ।
आई बिछाना केला ।
भावा बिछाना केला ।
भावजय बिछाना केला ।
बापा भारु* जी टाकिला ।
आई भारु जी टाकिला ।
भावा भारु जी टाकिला ।
तिथं भाऊ बोलता झाला ।
" तूं तर कोणाची कोण ? । "
" मी तर मुलखावरची दास । "
" खुशाल आमच्या पलंगीं आस । "
" तुमची जइता बहीण
तसाच राखावा इमान । "

---

* भारु – भार, पाय चेंपून श्रम हलके करणें.

राम तसाच उठला ।
आईच्या महाला गेला ।
" अग अग माझे आई ।
करग, करग भुकलाइ ।
करग, करग तान्हलाइ ।
जातो जइता आणायला । "
ढवळा नंदी शिनगारला ।
वनमारंगी लागला ।
एक वन ओलांडलं ।
दोन वनं ओलांडलं ।
तीन वनं ओलांडलं ।
चवथ्या पांचव्या वनाला ।
आलं जइताचं सासर ।
गेला वेशीच्या आंत ।
गेला वाड्याच्या आंत ।
भवराला* ' राम राम ' घातिला ।
रामा बसाया घातलं :
" अव आवाजी आंवाजी ।
जइताबाई दिसत नाहीं । "
" गेली असंल धुवायला । "
" विहिरी बारवा शोधिल्या ।
नदी-नाल्याला शोधिलं ।
तरी जइता दिसत नाहीं । "
" गेली असलं शेताला । "
" तळं मळं जी देखीलं ।
खळं वावर धुंडीलं ।
तरी जइता दिसत नाहीं । "

---

* भवर – भाऊजी, मेहुणा.

" तुमची जइता बाळातीण । "
" मला तशीच न्यायाची । "
जइता केली कणकीची ।
गोपा केला हळदीचा ।
घातली काचबंदी चोळी ।
नेसला चक्राचा पाटाव ।
घातला सर्व शिनगार ।
घातला नउ रतनी हार !
घातलं आंगडं टोपडं ।
सरी माठली* पिंपळपान ।
ढवळ्या नंदीवर बसवली ।
गेली वाड्याच्या बाहेरी ।
गेली वेशीच्या बाहेरी ।
वन मारगीं लागली ।
एक वन...तीन वनं ओलांडलं ।
चवथ्या पांचव्या वनाला ।
भाऊराया बोलता झाला ।
" अग अग जइताबाई ।
येवढा राग कशापाई ।
माझ्यासंगं बोलत नाहीं । "
जइता हालवून पाही ।
जइता डुलवून पाही ।
जइता देखीली कणकीची ।
गोपा देखीला हळदीचा ।
काढली काचबंदी चोळी ।
काढला चक्राचा पाटाव ।
काढला सर्व शिनगार ।

* माठली – बिंदली.

काढला नउ रतनी हार ।
काढलं आंगडं टोपडं ।
सरी माठली पिंपळपान ।
जईता ढकलून दिली ।
गोपा ढकलून दिला ।
रागं कुरुंद* झाला ।
राम घराशीं आला ।
आई बोलु जी लागला ।
" अग अग माझे आई ।
दे देऱ्हाऱ्याची सुरी ।
माझ्या बहिणीचा वध करी ।
मी बी जातो भवराच्या वधाला । "
हात जोडुनी विनती ।
बोल जइता दादाला ।
" ज्येच्या नांवें हळद लेवी ।
ज्येच्या नांवें कुंकु लेवी ।
ज्येच्या नांवें सवाशिण जाइल ।
नको वधूस भवराला । "

## वज्रचुड्याचें गाणें

देवकीचा हरि वैराळ झाला ॥
सोनसळी चुडा पेटारी भरला ॥
मथुरी नगरी चुडा प्रकाशला ॥
बोलुं लागल्या दासी कुणबिणी ॥
वैराळ दादा जाऊं कंसाच्या गांवा ॥
मग वैराळ मनीं हौसला ॥
लागला वनाच्या मार्गाला ॥

---

* कुरुंद – क्रुद्ध.

एक तरि वन वलांडिला ॥
दोन तरि वन वलांडिला ॥
तीन तरी वन वलांडिला ॥
चवथ्या पांचव्या वनाला ॥
आला तरी कंसाच्या गांवा ॥
" चुडा भरा बायांनो ॥ "
" चुडा भरा सयांनो ॥ "
कमळा ग बांई माडिवरि उभी ॥
वैराळ म्हणुनी हांका मारूं लागली ॥
मग वैराळ माडिवरी गेला ॥
कमळा ग बाई बस गादिवरी ॥
वैराळदादा बस भुईवरी ॥
" सोनसळी चुडा भर ठायी बंदी "
चुडा बसव माझ्या ठायीबंदी ॥
मग वैराळ मनिं क्रुद्ध झाला ॥
कळ लागविली तिच्या मनगटाला ॥
" आण ग कंथाच्या उशाचा ग खड्ग " ॥
दिली वैराळदादाच्या ग हातीं ॥
मग वैराळ चालता झाला ॥
कमळा ग बाई माडीवरी गेली ॥
" कंसवराज जाग व्हा तुम्ही ॥
देवकीचा हरी आला होता दारीं ॥
खडग् नेल त्यांनीं भुरळ घालुनी " ॥
कंसराज माडीखालीं आला ॥
" वैराळ " म्हणुनी हांका मारूं लागला ॥
" वैराळ नव्हे ; आहे तुझा भाचा " ॥
" आतां वरी खड्ग देतो तरी कसा " ॥
" जव मारल्या साती जणी बाया " ॥

"तव नाहीं रे आली तुला दया ॥
"आतां आलों मी तुझा सूड घ्याया"
चाल बदलून शेला ठेवला खुंटीवरी ॥
शेला ठेवला खुंटीवरी ॥
काढली कंबरेची सुरी ॥
काढली कंबरेची सुरी ॥
टाकली त्याच्या शीरेवरी ॥
टाकली त्याच्या शीरेवरी ॥
देव आले ओवाळाया ॥
देव आले ओवाळाया ॥
"अरे अरे चांडाळा !" ॥
"माझें माहेर बुडविलं" ॥
माझं माहेर बुडविलं" ॥

## जानपद उखाणे

वडसावित्रीचा पुजते वड,
बेंद्रांनीं केला चड * ॥
बेंद्राची घेतें काव ।
नागपंचमीचा जाव ॥
नागपंचमीच्या दिंडाची करते नेरी †
आली गवराया गणपतीची स्वारी ॥
गवराया गणपतीला वाहते दुर्वा ।
गवराया मोरयाचे घेते दोर ‡ ।
आलं म्हाळाचं § महिनं म्होर ॥
म्हाळाच्या महिन्याची निवडते डाळ ।
आली घटाची माळ ॥

---

* स्वारी, हल्ला. † न्याहारी. ‡ तातू, गंडा. § भाद्रपदांतील पितृपक्ष, महालय.

घटाच्या माळेला देते गांठी ।
शिलंगनानं केली दाटी ॥
शिलंगनाचं घेतें सोनं ।
दोनी दिवाळ्यांनीं केलं येनं ॥
दोनी दिवाळ्यांची पाजळते पंती ।
आली सक्रात नेनती ॥
संक्रातीचं पुजते सुगड ।
आली माही पुनव जुगड * ॥
माही पुनवेचं पुजते पारणं ।
शिमग्यांनीं घेतलं धरणं ॥
शिमग्याची मळते कणिक ।
आली रंगपंचमी उधळले रंग ।
आला पाडवा जबर जबर † जंग ॥
पाडव्याची उभारते गुडी ।
आखीतीज मारते उडी ॥
आखीतीचा पुजते करा ।
दिवाळी दसरा दम धरा ।
मग येईल 'शंकरराव' तुमचे घरा ॥

हा उखाणां फार लोकप्रिय दिसतो. प्रत्येक ठिकाणीं थोडा फरक दाखविणारे पदाचे पाठभेदहि फार. रा. वा. वि. जोशी यांनीं आपल्या 'लोककथा व लोकगीतें' या पुस्तकांत 'सणांची जंत्री' या गाण्यांत पाठभेदानें असला उखाणा दिलेला दिसतो. पण त्याचा शेवट नवऱ्याचे नांव घेण्यांत झालेला नाहीं.

---

* जुगड = या शब्दाचा अर्थ समाधानकारकपणें लागत नाहीं. जोडणारी, जुळणारी असा होऊं शकेल. † जबर जंग = जोरदार, लढाऊ.